# झांजर




लेखक,

**म. भा. मायनेकर**


**किंमत १ रुपया.**


: प्रकाशक :

**नवभारत प्रकाशनसंस्था, मुंबई ४.**

# भूपाळी—

लघुकथेचा संग्रह म्हटला कीं अलिकडे तरी एकदम धडकी भरते. मासिक, साप्ताहिक आणि दैनिकातून प्रसिद्ध झालेल्या कसल्या ना कसल्या तरी लघुकथा एकत्र करून, वर्तमानपत्रातील अशाच रटाळ लेखाचे लेखसंग्रह जसे आज प्रसिद्ध होत आहेत तशाच, लघुकथाही प्रसिद्ध होत आहेत. या कामीं नावाजलेल्या आणि सुप्रतिष्ठित झालेल्या अशा लेखकानीही पुढाकार घेतल्यामुळें आपले असल्या प्रकारचे लिखाण संग्रहित करण्याचा धीर नव्या लेखकानाही होऊ लागला आहे. म्हणूनच लघुकथाचा संग्रह म्हणताच आजच्या वाचकाला धडकी भरते.

मलाही क्षणभर तसेच वाटले. प्रस्तुत कथासंग्रहाचीं छापलेली पाने ज्यावेळीं माझ्याकडे अवलोकनासाठीं देण्यात आलीं त्यावेळीं मी उपेक्षा वृत्तीनेंच पहिल्यानें त्याच्याकडे पाहिले होते. वाचल्याशिवाय प्रस्ताव करायचा नाही—अगदीं अक्षरन् अक्षर काळजीपूर्वक वाचल्याशिवाय त्याबद्दल काही लिहायचें नाहीं—आणि तें जे काही वाचले असेल ते अंत:करणपूर्वक आवडल्याशिवाय त्याचा पुरस्कार करायचा नाही असा निश्चय असल्यामुळें ही छापलेली पानें हातीं घेताना प्रस्तुत प्रस्ताव लिहिण्याबद्दल मी निश्चित वचन दिलेले नव्हतें. अशीं छापलेली पाने वाचल्यावर प्रस्ताव लिहिण्याचें नाकारल्यामुळें काही तरुण लेखकाचा माझ्यावर राग झाला आहे हेंही मला माहित आहे, म्हणून पुस्तक वाचायला घेतलें—

लघुकथेच्या घडणीबद्दल गेल्या पन्नास वर्षांत कितीतरी थारेपालट झालेले आहेत. ‘मनोरंजना’तून प्रसिद्ध झालेल्या काहीं लघुकथा म्हणजे आजच्या सर्वसाधारण कादंबऱ्याच्या इतक्या लांबीरुंदींत आल्या होत्या. ‘तंत्र’ असा जो आज एक नवा शब्द प्रचारात आला आहे तो पूर्वीं नव्हता. तो शब्द प्रचारात नसताही त्यावेळीं लघुकथा लिहिल्या जात होत्या. गेल्या महायुद्धाच्या पूर्वकालापर्यंत या लघुकथाचें ‘तंत्र’ आजच्यापेक्षा अगदींच वेगळ्या स्वरूपाचें होते. त्या युद्धपूर्वकालात ‘ब्रिटिश’ वाङ्मयाखेरीज दुसरें वाङ्मय सहसा कुणी वाचीत नसत. त्या काळच्या विद्वानाच्या दृष्टीने ब्रिटिशेतर वाङ्मय वाचणारा क्वचित बंडखोर तर क्वचित महामूर्ख ठरत असे. गेल्या महायुद्धाच्यानंतरच ग्रेटब्रिटन खेरीज इतर देश जगात आहेत याचा पत्ता विद्वानाना सुद्धा लागूं लागला. रशियन क्रांतीमुळें रशियन वाङ्मयाकडे आणि त्या रशियन क्रांतीला कारणीभूत झालेल्या जर्मनप्रभृति देशातील वाङ्मयाकडे विद्वानाची सुद्धा नजर वळली. एकदोन ब्रिटिशप्रतिष्ठाधिष्ठित लेखक वगळून अमेरिकन लेखक वर्गाकडेही तोंपर्यंत कुणाची नजर वळली नव्हती. ओ-हेन्री सारख्या लघुकथालेखकाचीही ब्रिटिश लघुकथेशीं तुलना करून अगदीं परवा परवापर्यंत थट्टा केली जात होती. ब्रिटिशाच्या वाङ्मयाचें माप देशी वाङ्मयाला काटेकोरपणाने लावण्याची प्रथा गेल्या दहा वर्षांतच मोडली असे म्हटले तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

नव्या तंत्रानें लिहिलेल्या ज्या गोष्टी आज प्रसिद्ध होत आहेत त्यातल्या बहुतेकात लांबीरुंदीच्या छाटाछाटीपलिकडे फारसें नावीन्य क्वचितच आढळतें. बहुतेक लघुकथा ब्रिटिशी वळणाच्या असतात. ब्रिटिश वाङ्मयाच्या वाचनाच्या अतिरेकामुळें आणि अलिकडे

अलिकडे साम्यवादी समजल्या जाणाऱ्या वाङ्मयाच्या अभ्यासामुळें लघुकथेचें स्वरूप जरी बदललेलें असलें तरी त्यातला 'देशीपणा' दिवसेदिवस पार मावळला जात आहे. हरिभाऊ आपट्याच्या कथा आजच्या लघुकथेच्या तंत्राच्या दृष्टीने लब्याचौड्या वाटतील, पण त्याच्या कथा आणि कादबऱ्यात महाराष्ट्राच्या अस्सल मनोवृत्तीचें चित्र जितक्या प्रमाणात दिसून येत असे तितक्याच आजच्या गोष्टी, हरिभाऊंच्या काळाच्या मनोवृत्तीनें पहाणाऱ्या वाचकाला, अगदीं परक्या आणि परदेशी वाटतात. ती हरिभाऊकालीन लघुकथा वाचण्यासाठीं आमच्या काळातला जुना वाचक जितका आतुर झालेला दिसतो, तितकाच आजच्या लघुकथेच्या वाचनानें तो निराश होतो.

आजच्या बहुतेक लघुकथात, क्वचित् काव्य असते, क्वचित् तत्त्वज्ञान असते, क्वचित् अतिमानवता असते आणि क्वचित् ज्याला स्वप्नरजन किवा असेच काहीं म्हणतात ते असते. नसते काय ती लघुकथा—साधीसिधी, जशी घडली असेल तशी, किवा जशी घडावी अशी अपेक्षा असावी तशी एक कौटुंबिक, सासारिक किंवा सार्वजनिक 'गोष्ट'. ती अशी गोष्ट वाचण्याची ज्याला आवड आणि आतुरता असेल त्याला मायनेकर याच्या या गोष्टी वाचून समाधान वाटल्यावाचून रहाणार नाहीं. परदेशी वाङ्मयाच्या झळाळीनें डोळे दिपून लिहिलेली 'प्रेमकथा' प्रस्तुत कथासंग्रहात एकसुद्धा मिळणार नाहीं हा या संग्रहाचा विशेष आहे आणि हाच विशेष मला अत्यंत आवडला. 'प्रेमाखेरीज कथा नाहीं,' असे म्हणणारा जो एक परदेशी वृत्तीचा स्वदेशी लेखकवर्ग आहे त्याच्या अवास्तव आधुनिक तंत्राचा मायनेकराच्या गोष्टींत मागमूससुद्धा सापडणार नाहीं.

म्हणजे या गोष्टी आधुनिक तंत्राच्या कसोटीला उतरणार

नाहींत असे नव्हे, उलट आधुनिक तत्राचें ' देशी स्वरूप ' या कथेंतून प्रत्येक वाक्यात भरून राहिलेले दिसेल. कोणत्याही कथेत कुठेही एवढासुद्धा पाल्हाळ नाहीं, एवढीसुद्धा कृत्रिमता नाही, एवढासुद्धा ' परकेपणा ' नाहीं. शहरापासून काहीं मैल दूर गेल्यावर सर्वसाधारण व्यक्तीच्या ज्या मनोभावना सहृदय दृष्टीला दिसून येतात त्या मनोभावनाचे अकृत्रिम चित्र या गोष्टीतील प्रत्येक गोष्टीत अगदीं नैसर्गिक स्वरूपात असल्याचे दिसून येईल.

भिन्न परिस्थितीत गेलेल्या जिव्हाळयाच्या दोन मैत्रिणी मनोभूमीच्या बदलानें पारख्या झाल्यामुळे कशा जवळ आल्या त्याचें साध्या भाषेत लिहिलेले काव्यमय चित्र जसे सापडेल, तसेच अनादि स्वरूपाच्या सासूच्या स्वभावरचनेचे निरनिराळया दृष्टीकोणातून पाहिलेले निरनिराळे मासले या गोष्टींतून दिसून येतील. जुन्या नव्याच्या झगड्यात आपल्या स्वाभाविक वृत्तीने जाणारी जुनी व्यक्ति, आणि तितक्याच स्वाभाविक वृत्तीने नवेपणाशी तादात्म्य पावलेली नवी व्यक्ति, या दोहोंचा अकारण झालेला बुद्धिविभ्रम जसा या गोष्टींत पहायला सापडेल तसाच क्षुल्लक कारणाने कोर्टाची पायरी चढायला निघालेल्या खेडुताचा, अनादि ब्रिटिश कालापासून होत असलेला, अधःपातही या गोष्टींत दिसेल.

प्रत्येक गोष्टीचे परीक्षण या प्रस्तावनेत मला करायचे नाहीं. प्रस्तावना म्हणजे परीक्षण नव्हे. या गोष्टीकडे पहायला वाचकाला प्रवृत्त करण्यापुरतीच हा प्रस्ताव लिहिण्याची माझी भूमिका आहे. त्या भूमिकेला अनुसरून बऱ्या किंवा वाईट प्रकाराने वाचकाचे मन कलुषित करणें हा प्रस्तावना लेखकाचा बाणा नव्हे. मला सागायचें आहे ते एवढेंच, कीं आजपर्यंत मी वाचलेल्या मराठी भाषेतील कोणत्याही कथासंग्रहापेक्षा या संग्रहातील कथा अगदीं निराळ्या पद्धतीच्या आहेत. या कथाचें जें तत्र आहे तेंच आधुनिक

तंत्र होय, असे मी मोठ्या अभिमानानें म्हणेन. आधुनिक तंत्राच्या नावाखालीं केलेला विदेशीपणा जसा या गोष्टींत सापडणार नाहीं तशीच अलिकडे वावटळत चाललेली खोटी काव्यात्मकताही या गोष्टींत नाही. 'पीर डोंगरी' आणि 'पहिला पगार' याच्यासारख्या काव्यात्म स्वरुपाच्या ज्या गोष्टी या सग्रहात आहेत, त्यात भाषेच्या काव्यात्मकतेपेक्षा भावनेची आणि रचनेची काव्यात्मकताच जास्त असल्याचे दिसून येईल. आजच्या पदवीधराला कदाचित या गोष्टींत काव्य दिसणार नाहीं. पण हरिभाऊ आपट्याच्या कथेत काव्य आहे असे ज्याना वाटत असेल त्याना या सग्रहातील, दोनच गोष्टी वगळून बाकीच्या सर्व कथा हरिभाऊंच्या कालातील वाङ्मयीन भावनेच्या त्या पूर्वकालीन कथा आधुनिक स्वरूपात चितारलेल्या आहेत असे खात्रीने वाटेल.

कथेच्या क्षेत्रात हा संग्रह अव्वल दर्जाचा आहे. मायनेकराची ही ' झाजर ' आहे. हे झुजुमुजु संपून उषःकाल होईल, चागलें उजाडेल, सूर्यप्रकाश तीव्र होईल, तेव्हा मायनेकर हे हरिभाऊ आपटे याच्या प्रपचातील आधुनिक स्वरूपाचे एक तेजस्वी लेखक आहेत असे चिकित्सक टीकाकारालासुद्धा मराठी भाषेच्या अभिमानाने म्हणावे लागेल.

हाजी कासम वाडी,
मुंबई ता० २२-३-४२

**मामा वरेरकर**

# दिशा उजळतांना—

प्रस्तुत कथासंग्रह बखर चाळून पाहाणाऱ्याच्याहि एक गोष्ट चटकन ध्यानात येईल कीं यात एकहि प्रेमकथा नाहीं. अन् हेंच त्याचें वैशिष्टय आहे असें म्हणता येईल. कित्येकाच्या दृष्टीने मात्र ते एक वैगुण्यच ठरेल.

प्रस्तुत संग्रहात 'प्रेमकथा'ना सर्रास मज्जाव केल्याचे दिसून येईल. असे करण्यात थोडासा 'तऱ्हेवाईकपणा' होतो आहे याची मला जाणीव आहे. पण 'प्रेमा' शिवाय कथासग्रहाचे पान हलूं शकत नाहीं हा समज अगदीं चुकीचा असून दुसऱ्या कोणत्याहि भावनेच्या चित्रणानें सुद्धा लघुकथा यशस्वी करता येते हें दाखविण्यासाठींच ही भूमिका स्वीकारावी लागत आहे. असो.

सध्याच्या युद्धजन्य बिकट परिस्थितींत नव्या लेखकाचे एकादे पुस्तक प्रसिद्ध करणे हे किती धाडसाचे आहे ते सागण्याची आवश्यकता नाहीं. असे असूनहि माझ्या 'तऱ्हेवाईक' प्रयत्नाला उत्तेजन देण्यासाठीं म्हणून प्रस्तुत संग्रहाचे प्रकाशन हातीं घेतल्याबद्दल 'नवभारत प्रकाशन' संस्थेचा व प्रस्तावना लेखक श्री. मामासाहेब वरेरकर याचा मी अत्यंत आभारी आहें. हा योग जुळवून आणणारे व वेळोवेळीं माझ्या लेखनाला उत्तेजन देणारे श्री. पु. बा. उर्फ आप्पासाहेब कुळकर्णी यानीं वेळोवेळीं आपला अमूल्य वेळ खर्च केल्याबद्दल व अपरिमित श्रम घेतल्याबद्दल वाटणारी कृतज्ञता शब्दात व्यक्त करता येत नाहीं.

सहृदय रसिक 'झाजर'चे यथोचित स्वागत करतील अशी आशा आहे.

वसई (जि. ठाणें),<br>वर्षप्रतिपदा, शके १८६४ } **म. भा. मायनेकर**

# कांचेचें कपाट १

" नक्की येईन "

" खरच ? माझी शपथ ? नाहीतर ' नक्की 'च ! तें आहेच तुझं आपलं नेहमींच. "

" खचीत येईन. बघ तर खर. "

" बर पण किती वाजता ? "

" येईन चार साडेचारला. "

आज किती दिवसापासून कुदा सरलेला आपल्या घरीं येऊन जायला सागत होती. सरला आपली रोज नुसते ' येईन हं, येईन ' करून तिला झुलवीत असे.

सकाळींच कसल्याशा कपड्याचे माप घ्यायला सरला समोरच्या काकूंकडे गेली होती. येताना वाटेतच तिची कुदेशीं गाठ पडली. नेहमींप्रमाणें कुदा ' बॅडमिटन ' खेळून घरीं परतली होती या वेळीं.

सरला आपल्या घरीं येण्याचे का टाळते याचे राहून राहून तिला फार आश्चर्य वाटे. आज तिनें सरलेला आपल्या घरीं येण्याविषयीं निकराचा व शेवटचा आग्रह करण्याचे ठरविलें होते. तसा थोडा रागच आला होता तिला सरलेचा. का येऊ नये ? तसें पाहिलें तर सरल तिची बाळपणापासूनची मैत्रीण खरी, पण आता—एका व्ह. फा. मास्तराची बायको. उलट कुदा थोरा मोठ्या डॉक्टराची ' डॉक्टरीण ' ! काहींच किंमत नाहीं का तिच्या शब्दाला ?

पण—

सरलेच्या या विचित्र वागणूकीचें कारणही यातच होतें.

तिला ही विषमता तीव्रतेनें भासे. कुंदा कोण आपण कोण हे ती जाणून होती.

लहानपणींच्या गोड गोड स्मृती तिच्या हृदयात अजूनहि सुस्पष्ट होत्या. त्याच्याच शीतलतेमुळें तिला आपल्या संसारातील भगभग जाणवत नसे.

कुंदा तिची त्या काळची जीवाभावाची मैत्रीण ! शाळेत—कुठेही जाता येता त्या बरोबरच दिसायच्या. खेळताना, अभ्यास करताना, जिथे कुंदा तिथे सरल ! जणू काय एकमेकींना विळखून गवसेल त्या आधारानें वरवर वाढत जाणाऱ्या सुकुमार वेलीच त्या !

तरीपण त्यावेळीं त्यांच्यातही सामाजिक विषमता नव्हती असे नाहीं. कुंदेचा बाप एक नाणावलेला बडा वकील, तर सरलेचा बाप एक कलेक्टर कचेरींतला साधा कारकून. पण या विषमतेची जाणीव त्या काळीं त्या निर्मल बालिकाना कुठली !

त्या वेळीं त्या दोघींनींही आपल्या निर्मल मनात भविष्य-काळाचीं कितीतरी सुंदर सुंदर चित्रे चितारली होती.

मॅट्रिक होताच कुंदेला आपली सुखस्वप्ने थोड्याफार अंशाने खरीं झाल्याचें दिसून आले. उलट सरलेला जेमतेम मराठी पाचवी पर्यंत शिक्षण घेऊन, चार पाच वर्षे आईच्या हाताखाली उमेद-वारी केल्यावर कुठे पूर्वी चितारलेल्या काळाच्या परिस्थितीत दाखल होता आले. पण तिथें पाहिले तर काय ?—

तरी तिची अगदींच निराशा झाली असे म्हणता येणार नाहीं. तिचा नवरा वकील किंवा बॅरीस्टर नसला, साधा मराठी मास्तर असला तरी तो सुसंस्कृत होता; त्याच्यात माणूसकी होती. एकाद्या

वकीलाच्या अगर बॅरिस्टराच्या घरीं नसेल इतके सुख आपल्या बायकोला मिळावें म्हणून तो नित्य जपत असे.

त्याला पगार तो कितीसा असणार ?--सारा सत्तावीस रुपये. आई, बायको, दोन लहान भाऊ--इतक्याचा पोशिदा होता तो. त्यातल्या त्यात करता येईल ते तो करीत असे. सरलही शिवण-टीपण करून चार पैसे--जे काही मिळेल ते--ससाराला मदत म्हणून मिळवीत असे.

नि कुदा--तिची गोष्ट कुठे ? तिचा नवरा, डॉ. मोगरे चागला नावाजलेला डॉक्टर. त्याची प्राप्ती केवढी दाडगी ! कुदेला घरात इकडची काडी तिकडे देखील करण्याची जरूर नव्हती. दारीं चार गडीमाणसे, जिवाला विचारून विचारून खावे, हवे ते ल्यावें, सकाळीं खेळावें, सध्याकाळीं फिरावें—एकदरींत आनंदात होती ती.

तरीपण ती सरलेला विसरली नव्हती. आज किती वर्षे ती सरलेला भेटायला पाहात होती. ती माहेरीं जाई तेव्हा सरल सासरीं असायची, सरल माहेरीं येई तेव्हा ती सासरीं. एकाच गावात माहेर असूनहि आज कित्येक वर्षांत दोघींची भेट नाहीं.

सहा महिन्यापूर्वींच मुळे मास्तर इकडे बदलून आले तेव्हा कुठे तिची सरलेची भेट—अशी वाटेवरच कुठेशी. पहिल्यानें तर कुंदेनें तिला ओळखलेंच नाहीं. कोमेजलेल्या कुंदकळीसारखी दिसली ती तिला. पण ओळख पटल्यावर वाटेवरच कशा सख्या बहिणी-प्रमाणें कडकडून भेटल्या एकमेकींना त्या !

यानंतर एक वेळ कुदा सरलच्या घरींसुद्धा उभ्या उभ्या येऊन गेली.

ती नेहमीं सरलेला आपल्या घरीं येण्याबद्दल सागे. तिला वाटे, सरल आपली बालमैत्रीण आहे; तिनें आपल्या घरीं यावें, पूर्वी-सारखें मोकळ्या मनानें वागावें—

पण सरलेला आपल्या परिस्थितीची पूर्ण कल्पना होती. तिला ठाऊक होतें, कुंदा किती झालें तरी एका बड्या डॉक्टराची बायको, मोठ्या मातबराची सून—एकूण मोठीच ! आपल्या-सारख्या गरीबानें मोठ्याशीं जास्त सलगी ठेवणें चागलें नाहीं; दोन पावलें दूरच असणें चागले त्याच्यापासून.

तरीपण तिनें त्या दिवशीं कुंदेला तिच्या घरीं येण्याचें कबूल केलें.

* * *

" का, कुठ बुवा ? " तोंड धुवून बाहेर निघण्याच्या तयारीनें केस सारखे करीत असलेल्या सरलेकडे पाहून मास्तरानी हंसत हसत पृच्छा केली.

" इकडंच. म्हटल, आपणहि जावं आज फिरायला थोडंसं. " सरलेनंहि हंसत हसत म्हटले.

" म्हणजे ? "

मास्तरानी विस्मयानें तिच्याकडे पाहिलें, कारण त्यानीं आपल्या बायकोला विशेष कारणाशिवाय कधीं बाहेर पडताना पाहिलें नव्हते. तिचें बाहेर पडणें व्हायचें ते कधींकाळीं हळदीकुंकवाला; फार तर चैत्रात रामजन्मोत्सवाला. आज तसलें काहींच नसल्या-मुळे त्याना सरलेच्या बाहेर निघण्याच्या तयारीचें आश्चर्य वाटल्यास नवल नाहीं.

पण त्याना फार वेळ आश्चर्यात राहावें लागलें नाहीं.

" कुदा किती दिवसापासन बोलावतेय् आपल्या घरीं—माझी बालमैत्रीण आहे ती—म्हटल, जावं आज. टाळाटाळी तरी किती करायची रोज रोज ? " सरलेनें खुलासा केला.

" कुदा ? मोगरे डॉक्टराची बायको का ? "

मास्तराचा चेहरा गंभीर झाला होता जरा.

" हो. "

एवढ्या वेळात सरलेनें आपल्या साठ्यातलें जपून ठेवलेलें अस्मानी रगाचें पातळ काढून परिधान केलें व ट्रंकातला आपला हातरुमाल काढून घेतला. मास्तर तिच्या प्रत्येक हालचालीकडे बारकाईनें पाहात होते. त्याच्या चेहऱ्याकडे सरलेची सहज नजर गेली. कपाळावर साधारणशा आठ्याच पडल्या होत्या त्याच्या. सरलेला बापडीला उमज पडेना. जावे की न जावें हा प्रश्न पडला तिला. पण इतक्यात तिला कुदेला दिलेल्या सकाळच्या वचनाची आठवण झाली. न गेल तर कुदेला काय वाटेल ? हळव्या मनाची आहे ती. मागाहून समजूत घालता येईल का तिची ?

" जाऊ ना ? " मास्तराकडे पाहात जरा भीत भीतच सरलेने म्हटलें.

" हो हो, जा कीं. कुठ जाऊ येऊ नये असं कोण म्हणेल ? "

मास्तराच्या या समतींत असलेली नाखुषी सरलेला समजल्याशिवाय राहिली नाही. पण तिने पडत्या फळाची आज्ञा घेऊन बाहेर पाय काढला.

" पण मोठीं माणस आहेत ती ! " हे जड अंतःकरणानें मास्तरानी काढलेले अस्पष्ट उद्गार जाताना तिच्या कानीं आल्यावाचून राहिले नाहींत.

सरल आपल्या घरी आलेली पहाताच कुदेला केवढा आनंद झाला. ती आपल्याकडे येईल अशी तिला खात्रीच नव्हती मुळीं. तिला वाटे, कसली येते, ती; ' येईन, येईन ' म्हणते तेवढच !

कुंदेनें तिची आपल्या घरातल्या माणसाशीं—सासू, आजेसासू, नणद वगैरे माणसाशी ओळख करून दिली. श्रीमत पण किती साधीं माणसें, तिला वाटले. कुदेची सासू किती प्रेमळ—आपल्या सासू सारखीच ! पण काय असेल ते असो, तिचें कुदेच्या नणंदेबद्दल मत तितकेसें चागलें झालें नाहीं. शिक्षणाचा व

श्रीमंतीचा दिमाख तिला तिच्या चेहऱ्यावर व वागणूकींत दिसला. पण सरलेला काय करायच होतं तिच्याशीं ?

चहापान उरकल्यावर कुदेबरोबर सरलेनें मनसोक्त गप्पागोष्टी केल्या. आपल्या मैत्रीणीचें वैभव पाहून ती जितकी थक्क झाली तितकेंच तिला समाधान वाटलें. मात्र कुदेच्या एकंदर बोलण्यावरून तिला समजलें कीं, आपली मैत्रीण वाटते तितकी सुखी नाहीं, डॉक्टर तिच्याशीं तितक्या प्रेमळपणानें वागत नाहींत, त्याच्याकडून तिला योग्य मान मिळत नव्हता; ते सुलतानशाही गाजवीत तिच्यावर.

'दुरून डोंगर साजरे' म्हणतात ना तेच खरें !

"अग हो !" कुंदा एकदम काहींतरी आठवल्यासारखे करून म्हणाली, "एक राहिलं ग ! तुला ते विमलवन्सचं पुस्तकांचं नवं कपाट दाखवायचं राहिलंच... चल." आणि तिचा हात मोठ्या प्रेमानें आपल्या हातात धरून कुदेनें तिला पलीकडच्या खोलींत जवळ जवळ ओढीतच नेले.

टेबलापाशीं टाईम्सचा अंक चाळीत असलेल्या विमलवन्सना आपल्या भावजयीचे हें एका 'मास्तरणी'शीं मोकळेपणाचे वागणें बिलकूल रुचले नाहीं हे त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होते.

"हें पाहिलंस ते कपाट!" कुदेनें समोरच्या त्या भव्य काचेच्या कपाटाकडे बोट करीत म्हटले.

सरल तर थक्कच झाली तें कपाट पाहून.

"वा ! किती सुदर आहे ग ! काचेवरची चित्रे तरी किती मोहक ! नाहीं का ? पसंत करणाऱ्याची रसिकता दिसून येते खरी." सरलेनें खूप वर्णन केले कपाटाचें.

आपल्या कपाटाचें हें वर्णन व आपल्या आगच्या रसिकतेचा उल्लेख ऐकून विमलवन्संच्या अंगावर मूठभर मास आल्यासारखे झाले.

" किती किंमत पडली असेल असं वाटतं तुम्हांला ? " सरले-कडे पाहात त्यानीं आढ्यतेनें विचारलें.

बिचारी सरल ! तिला काय ठाऊक असल्या कपाटाची किंमत ! तिनें कुठे पाहिलीं होती असली कपाटे कधीं—माहेरीं नाहीं आणि घरींहि नाही. जरा गोंधळल्यासारखीच झाली ती या प्रश्नानें.

" काय सांगावी किंमत आपण तरी बाई ! आम्हाला कुठं पाह्यला मिळतात असलीं कपाट ! " यावेळीं सरलेच्या डोळ्यापुढें आपली परिस्थिति उभी राहिली. तिला फार वाईट वाटलें. झट-कन् डोळे ओले झाले तिचे. सरलेची ही मनःस्थिति कुंदेच्या ध्यानी आल्यावाचून राहिली नाहीं. लागलीच तिनें हा विषय येथेच थांबविण्यासाठीं म्हटले,

" काय करायचय किंमतीशीं तिला वन्स ? "

पण विमलवन्सं येवढ्यावर थांबायला कुठे तयार होत्या.

" दोनशें त्रेचाळीस रुपये पडले त्याला. आणखी सात आठ रुपये—ते घरीं आणण्याचा खर्च मिळून झालेच अडीचशें ! " त्यानीं हिशेब दिला.

" अबब ! " सरल येवढेंच म्हणाली.

" नुसती नकशीच काढण्याची मजुरी होईल साठएक रुपये. " नकशीवर बोट फिरवीत विमलवन्स म्हणाल्या.

" असेल, असेल " असेच काहींतरी सरल त्यावर म्हणाली.

आपल्या श्रीमंतीच्या झगझगाटानें एका गरीब हृदयाला चीत केल्याच्या आनदाचें आसूरी हास्य विमलवन्संच्या चेहऱ्यावर झळकत होतें.

सरल कुंदेचा निरोप घेऊन घरीं यावयास निघाली ती केव्हा घरीं येऊन पोंचली ते तिचें तिलाच समजले नाहीं. कुंदेच्या स्थितीबद्दलचे विचार सारखे तिच्या मनात नाचत होते.

खरंच मोठ्या माणसाची गोष्टच कुठें ! किती सुदर कपाट ते ! असल कपाट मिळणं आपल्यासारख्या गरीबाला कधींतरी शक्य आहे का ?

* * * *

या नंतर आठ दहा दिवस गेले. कुदा तिला एक दोन वेंळा अशीच कुठेतरी भेटली होती. सरलेनें आपल्याकडे मधून मधून येणें ठेवावे ही तिची इच्छा, पण सरलेला कुठे फुरसत होती ? तिची सासू गेल्या महिन्यात आपल्या भावाकडे डहाणूस गेली होती ती पाच सहा दिवसापूर्वींच इकडे परत आली होती. दोन दिवस झाले असतील, म्हातारीला मलेरियासारखा ताप येत होता. तिचें पेज पाणी पाह्यचें, शिवण—हल्लीं थोडें शिवणाचे काम अधिक मिळू लागले होतें—दुसरीं घरातली रोजची कामे. वेळ कुठे मिळत होता बिचारीला बाहेर पडायला ?

पण माणसाकडे गेल्यावाचून गोडी राहात नाही म्हणून तिनें एकदोन दिवसात वेळात वेळ काढून कुदेकडे जायचं ठरविले होते.

आज तिच्या सासूचा ताप साफ निघाला होता. तशात रविवार असल्यामुळे मास्तराना सुटी होती; त्यामुळे कामाची विशेष गर्दी नव्हती. म्हणून सरलेनें आज कुंदेकडे जायचें नक्की केलें. तिच्या सासूची बिचारीची काही ना नव्हती तिला.

* * *

" फुटोत डोळे मेल्याचे. सोन्यासारख कपाट—! दाखवायच कशाला असल्या भिकारड्याना ?—मला तरी वाटलच—दृष्ट लागून मोठमोठे खडक देखील फुटतात—"

कुंदेच्या ओटीवर पाऊल टाकताच शेजारच्या खोलींतून विमलवन्सच्या तोंडचा कडकडाट सरलेच्या कानी आला.

आपल्याला घेरी येते कीं काय अशी तिला भीति वाटली.

जवळच असलेल्या कुदेनें तिला सावरले नसते तर पडलीच असती ती खालीं.

मोठीं माणसें हीं !

कुदेनें तिला आपल्या खोलीत नेले व घट्ट पोटाशीं धरलें. बधारा फुटल्यावर अडविलेले पाणी स्वैर वाहू लागते त्याप्रमाणें चारी डोळ्यातून पाण्याचा पूर वाहू लागला.

बराच वेळपर्यंत कुणाच्याहि तोंडून शब्द फुटेना.

" सर ऽ ऽ ऽ ल ! "

" कुदा ऽ ऽ ऽ ! "

" सरल, शपथ आहे तुला माझ्या गळ्याची. तू वाईट वाटून घेऊं नकोस. " भावनावेग ओसरल्यावर सरलेच्या कुरळ्या केसावर हात फिरवीत स्फुदत स्फुदत कुदेनें म्हटले.

" आमच्या वन्सच तश्शा आहेत ग. त्याच बर कुणाशीं ? "

" छेः ग ! त्याचा दोष कसला ? माझाच दोष,—कुदा, आमच्या गरीबीचाच दोष हा ! बोल कुणाला लावावा ! "

सरलेच्या हृदयाच्या चिधड्या चिधड्या झाल्या होत्या.

विमलवन्सचें कपाट फुटलें, नवी काच घालून ते पूर्वीप्रमाणें करता येईल.

पण—

सरल मनाच्या सरलेच्या हृदयाचें कपाट विमलवन्संच्या शब्दाच्या कठोर ठोकरीने फुटले—ते नीट होईल का ?

कुदेच्या—कुणाहि श्रीमताच्या—घरीं कधींहि पाऊल न टाकण्याच्या निश्चयानें सरल घरीं परतली.

* * *

" येत्या पहिलीपासून एकदम एका खेड्यात—पाय-गावला—बदली झालीय, म्हटलं माझी. "

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मास्तर शाळेंतून घरीं येतांच पडक्या चेहऱ्यानें सरलेला म्हणाले,

" अस्सं ? मग काय वाईट झालं ? "

सरलेच्या या अनपेक्षित उद्गाराने चमकून मास्तर तिच्याकडे 'आ' वासून पाहूं लागले.

# मंदाची आई २

Mother of Manda.

मार्च महिन्याची पहिली तारीख होती. त्या दिवशीं आमच्या शेजारची एक खोली सोडून पलीकडच्या खोलीत एक नवीन बिऱ्हाड आले. अवघी इनमिन तीन—कीं—चार माणसे ! नवरा, बायको त्याची एक तीनचार वर्षांची चिमुरडी पोर व त्या नवऱ्याची आई, पण त्याच्या बायकोची सासू ! होय ! खरीखुरी सासूच होती ती ! खरा अधिकार गाजविणारी होती.

मार्च महिना म्हणजे आम्हा मॅट्रीकच्या विद्यार्थ्यांचा अभ्यासाच्या धुमधडाक्याचा महिना. विशेषतः दुसरा पधरवडा. बारा एप्रीलला आमची परीक्षा होती. अशा या धामधुमीच्या काळात अभ्यासाच्या अलीपलीकडे लक्ष देणें आमच्यासारख्या घोक्या विद्यार्थ्यांना शक्य नसते; व म्हणूनच आमच्या शेजारीं आलेल्या या नवीन कुटुंबातील माणसाकडे मला तितकेसे लक्ष देता आलें नाहीं. परतु गावाविषयी नाहीं तरी त्या सर्वांच्या नावाविषयीं आमच्या मातोश्रींकडून मला पुष्कळशी माहिती मिळाली.

गगाधर त्या नवऱ्याचें नाव; व त्याच्या बायकोचें नाव उमा. तिच्या सासूचें नाव रखमाबाई कीं ठमाबाई ते काहीं समजलें नाहीं. पण ती चिमुरडी पोर—मदा—तिला 'आजी' म्हणत असे, हें खरें.

आजी ! वर सागितले आहेच की, ती खराखुरा अधिकार गाजविणारी सासू होती. म्हातारीची शिस्त किती कडक ! तिच्या दृष्टीनें

शिस्त, पण जगाच्या—निदान माझ्या—दृष्टीनें जिवत जाच. वरून दिसायला म्हातारी कशी गोगलगाय, पण पोटात ?—केवढाले पाय !

दगडी देवाविषयी म्हातारी किती दक्ष !—रोज नियमाने विठोबाच्या, रामाच्या नाहींतर कृष्णाच्या—कुणातरी देवाच्या दर्शनाला जायचीच ती ! आटोक्यातल्या एकाहि कीर्तनाचा 'मोका' घालवून पुण्य दवडीत नसे ती कधीं ! आज काय शनिवार, उद्या सोमवार, परवा गुरुवार—उपासाच्या निमित्ताने बहुतेक वार रोखून धरले होते तिने !

मंदाची आई ! उमा—खरी साध्वी होती बिचारी. 'चाडाळीण,' 'अवदसा' वगैरे सारख्या शब्दानीं साजसकाळ गौरविली जाणारी ती—खरोखरीच, "सीता, मंदोदरी, तारा—" याच्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ वाटे मला. किती सुशील अन् किती सालस ! बोलण्याचालण्याची पद्धत तरी किती भारदस्त—सरळ ! तिला पाहाताक्षणींच कुणालाहि आदरच वाटला पाहिजे तिच्याबद्दल ! पवित्रतेचें तेज सदैव विलसत असे चेहऱ्यावर तिच्या ! सासू इतका जाच करी पण कधीं तोंडातून शब्द !

गंगाधर ! अगदीं शंभू होता तो. कुठल्याशा गिरणीमध्ये साठ एक रुपयाची नोकरी होती त्याला. आपले काम भलें कीं आपण भला. आजुबाजूला कधीं बघतच नसे तो. का कुणास ठाऊक; घराविषयी अगदीं उदासीन असायचा नेहमी. वेळ असलाच, तर जरासें गॅलरींत निर्विकार मनाने उभे राहावें; कुणी बोलले तर त्यावर एकादाच शब्द टाकावा. बस्स् याशिवाय बाहेर कुणाशीं थट्टा नाहीं, विनोद नाहीं, चर्चा नाहीं कीं काहीं नाहीं. मला फार आश्चर्य वाटे त्याच्या या स्वभावाचे ! निमित्त काढून कधीं कधीं गॅलरींत त्याच्याशीं बोलण्याचा मी खूप प्रयत्न करीत असें; पण तें तितकेंसें कधींच जमत नसे.

नि मंदा ! किती गोड अन् खेळकर पोर ! किती बोलकी ! माझ्याशीं खूपखूप बोलायची ती. जणूकाय, बापाच्या अबोलके-पणाची आपण भरपाईच करी.

" अप्पा आज कनी काय जम्मत ज्याली ! मला आजीनं;—"
' न् काहो अप्पा, माझी आई काहो अशी जेवण करताना रडते कधीं कधीं ? "

मी मनात काय ते समजत असे, पण तिला लटकेच म्हणे, " चल खुळी कुठली ! मोठीं माणस रडतात का कधीं ? जेवण करतांना धूरबीर जात असेल तुझ्या आईच्या डोळ्यात. "

त्यावर, " तुमच्या आईच्याही डोळ्यात अशाच धूर ज्यातो का हो ? " असे ती मला उलट विचारी.

" छे, छे ! आम्ही शेगड्या वापरतों मदा; मग धूर कसा जाणार तिच्या डोळ्यात ? "

यावर तिचें साधारणच समाधान होई.

* * *

आमची परीक्षा होऊन गेली. मला पेपर साधारण बरे गेले होते, असे म्हणावयास हरकत नाही. अगदींच काहीं ' होपलेस ' नव्हतों मी. मागे अभ्यासाचा लकडा नसल्यामुळें मला आता मुबलक मोकळेपणा वाटत होता. त्यामुळें मला आमच्या ' गंगाधरराव आणि कंपनी ' कडे अधिक लक्ष पुरविणे शक्य झालें. आता तर ह्या कामीं एक चागली सोय झाली. त्याच्या व आमच्या दरम्यान असलेला एक भाडोत्री निघून गेला. आमची जागा आम्हाला पुरत नसे, तशात एकाद दुसरा पाहुणा आला कीं, अगदींच गैरसोय होई. म्हणून आमच्या अण्णानीं ती रिकामी झालेली जागा आमच्या ताब्यात घेऊन टाकली. बसण्याउठण्या-करिता या नवीन खोलीचा काहीं भाग मी खास माझ्याकरिता

ताबडतोब ' रिझर्व ' केला. यात माझा एकच उद्देश होता. नि तो म्हणजे आमच्या शेजारच्या घरातले आजीचे ' राजकारण ' मला अधिक स्पष्ट कळावे.

यापुढें मी माझा बहुतेक वेळ या खोलीतच घालवीत असे. आजीचा जरा चढता स्वर कानीं आला, कीं वाचीत असलेला अंक किंवा पुस्तक तसेच डोळ्यासमोर ठेवून मी तिकडे कान देत असे. पण काय झाले कुणास ठाऊक, हल्लीं माझे वास्तव्य शेजारीं झाल्यापासून आजीचा आवाज पूर्वीच्या इतका चढत नसे. तशा आजी काहीं कमी धूर्त नव्हत्या ! त्यात कदाचित् आपले ' राजकारण ' माझ्यासारख्या तिऱ्हाइताला कळू न देण्याची खबरदारी असावी.

आताशा कधीं कधीं गंगाधरराव माझ्या खोलीत येई; परंतु औपचारिक बोलण्यापलीकडे आमचें बोलणे होत नसे. तरी कधीं कधीं त्याच्या घरच्या धुसफुसी विषयी त्याच्याकडे खुबीनें गोष्ट काढण्याचा मी प्रयत्न करीत असे, पण त्यापासून त्याला त्रास होतो असे दिसून येताच मी त्या विषयाला तितक्याच खुबीने कलाटणी देत असे.

मात्र याबद्दल त्याचें माझे जें थोडेंसें बोलणें होई, त्यावरून मला येवढेच कळून चुकले कीं, बायकोबद्दल त्याला जितकी सहानुभूति वाटते तितकाच—किंबहुना वाजवीपेक्षा जास्तच–त्याला आपल्या आईबद्दल आदर वाटतो. खऱ्या गोष्टींतहि बायकोच्या बाजूला सहानुभूतिपूर्वक विचार करून आईचें मन दुखविणें त्याला शक्य नव्हते.

* * *

त्या दिवशीं गंगाधरराव कामावर गेला नव्हता.

" का गुरो ? आज घरींच ? " तो गॅलरींत दिसताच मी त्याला विचारलें.

" जरा तब्येत ठीक नाहीं; सरदी झालीय् थोडीशी. "

दुपारीं काहीं कामाकरिता पार्ल्याला गेलों होतों, तो रात्रीं साडे नवाला घरीं आलों. घरीं आल्यावर मला कळलें कीं, गंगाधर-रावाला थोडासा ताप आला आहे.

असेल साधा सर्दीचा ताप, मला वाटले. उद्या सकाळींच जाऊन पाहूं त्याला, असें म्हणून मी स्वस्थच राहिलों.

त्या दिवशीं मला थोडेंसें अधिक श्रमल्यासारखे वाटत होतें. अंथरुणावर पडताक्षणींच झोंप लागली मला.

" अप्पा, अप्पा, जरा उठता का ? " कुणीतरी हलकेंच दार वाजवीत होते. मी दचकून उठलों.

" अप्पा,—" पुन्हा तेच कापरे शब्द.

मी मंदाच्या आईचा आवाज ओळखला, पण यापलीकडे मला काहींच समजेना. अगदीं दिङ्मूढ झालों होतों मी. झटकन दिवा लावून दाराची कडी काढली. टेबलावरच्या टाईमपीसात दीड झाला होता.

" मंदाच्या आई ? काय ? " मी भीत भीत विचारलें.

" जरा इकडे या ना. पहा कसे बडबडताहेत. " तिनें रडकुंडीस येऊन म्हटलें.

आता माझ्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला. ही सकाळची ' थोडीशी सर्दी ' !

मी तसाच गंगाधररावाकडे गेलों. त्याच्या खोलींत जाण्याची माझी ही पहिलीच खेप.

मला पहाताच त्यानें हंसण्याचा थोडासा प्रयत्न केला; व स्वतःशीं काहींतरी असबद्ध बडबडला. त्याच्या अंगाची लाही लाही होत होती असें दिसले. डोळे अगदीं इंगळासारखे लाल झाले होते त्याचे. अंगाला हात लावून पाहाताच मी जरा चरक-लोंच—साडेचार डिग्री तरी ताप असावा.

"काहीं घाबरण्याचें कारण नाही. पित्त झालेलं दिसतय्. मला सुद्धा थोडासा ताप आला कीं, अशीच बडबडण्याची सवय आहे."जवळच चिंतातूर होऊन उभ्या असलेल्या सासू-सूनेकडे वळत मीं म्हटलें.

" अऽऽऽऽ—? हं—! " आजी गोंधळल्या.

" मोगरे डॉक्टराना आणूं, वाटल तर ! " मीं सल्ला दिला.

" आणायला पाहिजेच नाहीं का ? " मंदाची आई करुण स्वरात म्हणाली.

तिचा हा पुढे पुढे बोलण्याचा ' धीटपणा " पाहून म्हातारीनें तिजकडे टाकलेला क्रुद्ध दृष्टीक्षेप माझ्या नजरेंतून सुटला नाहीं.

गरीब बिचारी मंदाची आई !

तीन चार दिवसानी ' व्हिजीट 'चे वेळीं गगाधररावाला डबल न्युमोनिया झाला असल्याचें मला डॉक्टरानीं इंग्रजींत स्पष्ट सागितले व विशेष काळजी घेण्याबद्दल बजावले. चेहरा उतरलाच माझा; पण तसे कुणाच्याहि लक्षात येऊं दिले नाहीं मी.

" काय म्हणाले डॉक्टर ? " डॉक्टर गेल्यावर मंदाच्या आईनें मला अधीरपणे विचारले.

" काहीं भीति नाहीं. आपोआप चार सहा दिवसानीं ताप उतरेल अस म्हणाले डॉक्टर " मी जरा चाचरतच सागितलें.

बिचारी साध्वी ! तिला इग्रजी येत नव्हते म्हणून ठीक !

मोगरे डॉक्टराकडून औषध; बाजारातून बर्फ, मोसंबी वगैरे लागेल ते आणण्याचे काम मी दक्षतेनें करीत असें. पाच सहा दिवसानीं गगाधररावाचा ताप खरोखरीच कमी होऊ लागला.

एक दिवस मंदाची आई गंगाधररावाच्या अंथरुणाजवळच मोसंबीचा रस काढीत असता, मीं म्हटले, " मंदाच्या आई, सागितल होतं ना मी तुम्हाला ?..... किती भ्यायला होता तुम्ही त्या दिवशीं ! "

यावर तिनें वर पाहून कृतज्ञतेनें फक्त स्मित केले. गगाधरराव माझ्या उपकाराची मला जाणीव करून देऊ लागला, पण मी त्याला जास्त बोल्र दिलेच नाही.

*  *  *  *

यानंतर तीन चार दिवसाची गोष्ट. सध्याकाळीं खोलीत टेब-लाशीं कसला तरी अक चाळीत होतों मी. माझ्या कानी खालील शब्द कडाडले--

" अवदसा, चाडाळीण--"

मी समजलों गगाधररावाचा ताप उतरला, पण आजीचा सताप चढला.

मी तडक आईकडे गेलों, व तिच्याकडे याबद्दल खुलासा मागितला.

"एका हातानं टाळी वाजत नाही, दिनू." आईनें निकाल दिला.

आईचे बोलणें जरा चमत्कारिकच वाटले मला.

" ते खर, पण आज असा हा अवचित भडका का उडाला ?" मी त्रासून विचारले.

" अरे, ती गंगाधरची बायको--तिनं वाटतं, नवऱ्याला सकाळीं औषधाऐवजीं गुळण्या करण्याचं पाणी पाजल. लक्षच नाही धड. म्हातारी बोलते, तिच तोंड दिसतं—आईनें खुलासा केला.

" पण जरास पोटात गेल म्हणून काहीं होत नाही, आई; ते काही विष नाहीं. " मी म्हणालो.

असा राग आला होता मला आईचा. पण काय करणार ? मला आणखी काहींच सागायला जमेना. प्रवाहाविरुद्ध वल्हविणें फार कठीण असते.

बिचारी मदाची आई ! जाणूनबुजून का पाजलें तिने ते. पाणी आपल्या नवऱ्याला ? जाग्रणामुळें झाले तसें.

मला फार वाईट वाटले, काय हा सासुरवास ? कुणीच नाहीं का सहानुभूतीचे चार शब्द बोलायला तिच्याशीं !

*　　*　　*

मेची एक तारीख उगवली आणि मावळूनहि गेली. आज आमचा रिझल्ट लागून मी पास झालो होतो. सर्वांना फार आनंद झाला. आमच्या अण्णानीं ऑफिसातून येताना पेढे आणले. पहिल्या प्रथम मी गंगाधररावाकडे पेढे घेऊन गेलो.

" अप्पा, पास झालात ? ठीक " गंगाधररावानें समाधान व्यक्त केले.

थोडासा गंगाधररावाकडे बोलत बसलो मी. त्यानें आता दोन महिन्याची रजा घेतली होती. हवापालट करण्यासाठीं नाशिकला चुलत भावाकडे काही दिवस राहावयास जायचा त्याचा विचार होता. थोड्याच दिवसाचा परिचय पण मला त्याबद्दल जबरदस्त आपलेपणा वाटत होता.

आठएक दिवसानी मी पुण्यास मामाकडे कॉलेजमध्यें जाण्यासाठीं निघून गेलों. दुसऱ्या दिवशीं गंगाधरराव बायकोला माहेरीं पाठवून आईसह नाशिकला जाणार होता.

पुण्यास गेल्यावरहि कित्येक दिवस गंगाधररावाच्या घरचें चित्र माझ्या डोळ्यासमोर वारवार येत असे.

मंदाची आई ! बिचारी साध्वी !

तिच्याच पुण्याईने गंगाधरराव आजारातून उठला !

दीडएक महिन्यानें घरीं पत्र पाठविले तेव्हा गंगाधररावाविषयी काही खुशाली कळते कीं नाहीं याबद्दल मी विचारलें. उत्तर आल्यावर निराशाच झाली माझी. गेल्यापासून त्याची काहींच खुशाली कळत नसल्याचे मला तिकडून समजलें.

*　　*　　*

सप्टेंबरात गणपतीकरिता घरीं आलो त्यावेळी गंगाधररावाची ग्रोली उघडी असल्याचे दिसले. जवळ येताच आत दुसरेच ार्वीन चेहरे दिसू लागले. मला उलगडा होईना याचा.

घरात आल्यावर थोड्या वेळाने मी त्याबद्दल आईकडे ग्रौकशी केली.

"गंगाधररावाचं बिऱ्हाड गेलं." आई संथपणाने सांगू लागली, ' हे दुसरे देशमुख आले आहेत—फार चांगली माणसं हो!"

मी जरा चिडलोच.

"चांगली नि वाईट काय करायचंयू आपल्याला त्याच्याशी? ण, गंगाधररावाच्या घरची खुशाली सांग ना कायती." मी अधीरपणें म्हटले.

"बिचाऱ्याचे ग्रह फिरले आहेत, दुसरं काय!" आईने धक्का देला, "उमा—त्याची बायको गेल्या महिन्यात वारली. बाळंत ाली होती बिचारी! नवऱ्याच्या आजाराचा त्रास भोवला म्हण, ाही म्हण. पण—"

केवढा जबरदस्त धक्का बसला मला. डोळ्यासमोर अंधेरंच दिसू ागला माझ्या.

"पण सुटली बिचारी." माझ्या तोंडून नकळत शब्द निघाले.

आईला काही नीटसे उमगेना.

"अवदसा, चांडाळीण!" आजीच्या तोंडचे शब्द कानात ्डाडल्याचा भास झाला मला. चित्त बधीर झाल्यासारखे वाटले.

पण दुसऱ्याच क्षणी, कोणत्या तरी मानसिक तळमळीने त्याच ोन शब्दाचा प्रतिध्वनि उमटला—

"अवदसा, चांडाळीण!!!"

# कोर्टाची पायरी ३

पाटगावची पाटीलकी आज कैक पिढ्यापासून दगडू पाटलाच्या घराण्यात चालू होती. प्रामाणिक व सरळ घराणे असा त्याच्या बापापर्यंत त्या घराण्याचा लौकिक चालून आला होता. पण काय असेल ते असो, बापाच्या पश्चात् दगडूकडे पाटीलकी आल्यापासून लोक त्याला मात्र तितकासा मान देत नसत. येवढेच नव्हे तर एकदरींत त्याच्याविषयी गावात लोकमतहि प्रतिकूलच. काहीं वर्षे लोटल्यावर तर लोक त्याचा उघड उपहास करूं लागले. दगडूहि अलीकडे गावकऱ्याशी उर्मटपणाने वागून आपली ‘ पाटीलकी ’ गाजवू लागला होता. कुणाचे गुरू नुसते त्याच्या शेतात शिरले कीं बस्स; दगडूनें अटकविलेच त्याला. मग त्याचा मालक गरीब असो दुबळा असो—नुकसान भरपाईसकट दंड अगदीं ठोठावून घेत असे तो त्याजपासून. सरकारी कामासाठी वाटेल त्याला त्याच्या अडीअडचणींकडे लक्ष न देता ‘ वेठी’वर नेत असे तो. अशा रीतीनें दगडूनें कैक जणाना चागले ‘ शिकविले ’ होते.

मात्र याचा परीणाम असा झाला कीं, गावात त्याचे अनेक वैरी झाले. त्याचे शेजारीसुद्धा त्याच्या वाईटावर टपून बसले. पण दगडू बोलूनचालून पडला गावचा पाटील ! तो का त्याची पर्वा करणार ? तोहि एकेकाला चागला धडा शिकविण्याची वाट पहात होता.

एक दिवस असाच कुणाचा एक बैल त्याच्या अंगणात

गिरला. बैल पहाताच दगडूची सूडबुद्धि जागृत झाली. " रामजी भोईराचा नवा बैल अं ! " असे म्हणून त्यानें गड्याकडून त्याला ताबडतोब दारासमोरच एका खांबाला बांधून घातले व हातात एक चिंचेचा फोंग घेऊन त्याला रक्तबंबाळ होईपर्यंत यथेच्छ बडविलें.

हा हा म्हणता ही गोष्ट रामजीच्या कानी गेली. त्या वेळीं तो शेतात होता. नुकतेच काम थांबवून भाकर खायला बसत होता बिचारा. दगडू पाटलाच्या जागेत बैल गेला हे ऐकून काळजात धस्स् झाले त्याच्या. शेतकऱ्याची आपल्या जनावरावर पोटच्या पोरापेक्षा जास्त माया असते. तो तसाच उठला व हातात दोरी घेऊन पाटलाच्या घराकडे धावतच निघाला.

" हा पाहा कसा बाजीरावासारखा येतोय् × × × लेक " रामजीला दुरून येताना पाहून दगडू उसळला.

त्याचा एकदर अवतार पाहून रामजी मनात समजला की आज काहीं ठीक चिन्ह नाही.

" बेशरम ! जनावर बेलाशक दुसऱ्याच्या जागेत घालतोस ? फार माजलायस, नाहीं का ? " दगडू रागानें बेफाम झाला होता.

" पाटील, अस काय करता वेड्यासारख ? मुद्दाम नाही घालीत कुणी जनावर दुसऱ्याच्या जागेत. पोराबरोबर येत होत घराकडे—सुटलं असेल हातून त्याच्या. नवच घेतलं आहे बघा " रामजी भोईर विनवणीच्या स्वरातच बोलत होता.

" अरे, पाह्यलेत पाह्यलेत असे नवे बैल घेणारे पुष्कळ ! आज नुसत झोडपलय्, फिरून आल तर तगडच तोडीन. "

इतका वेळपर्यंत रामजीनें बैलाच्या पाठीकडे पाहिलेच नव्हते; पण जेव्हा त्याचें तिकडे लक्ष गेले तेव्हा त्याच्या डोळ्यात झटकन् अश्रूच दाटले. तो एकदम देहभान विसरून दगडूकडे वळून त्वेषाने म्हणाला,

"अरे मागा, थोडीतरी माणूसकी ठेवायची होतीस? मुक्या जनावराला मारून काय मिळाल तुला? तुझ नुकसान कायते दिल असत, दड दिला असता—"

झाले. येवढ्यानेंच दगडूच्या रागाचा पारा पराकाष्ठेला पोचला. एकदम रामजीच्या अंगावर धावून त्याने त्याच्या तोंडावर व कुशींत दोनचार ठोसे लगावले. पण रामजी म्हातारा असला तरी लेचापेचा नव्हता, आजूबाजूला गमत पहाण्यासाठी जमलेल्या लोकानीं मध्यस्थी केली नसती, तर त्यानें दगडूला उलट चागलेच पाणी पाजले असते.

खाबाशी बाधलेला बैल आपल्या हाताने सोडवून रामजी त्यासह घरी आला.

थोडा वेळ झाला नाहीं तोच त्याचा शेजारी दाजीबा त्याच्या दारीं येऊन थडकला.

" माझ ऐका तुम्ही, मोईर. आजच्या आज जाऊन फौजदाराकडे फिर्याद द्या तुम्हीं. चागल शिकवल पाह्यजे दगडूला. फार माजलाय् लेकाचा!" दाजीबाने मसलत दिली.

" ते खर दाजीबा. पण आपल्याला काय कोर्टदरबाराची माहिती? इतक वय गेल तरी कोर्टाची पायरी ठाऊक नाहीं."

" अस म्हणून कस चालेल मोईर? वेळ आली की, माहिती करून घेतलीच पाह्यजे प्रत्येक गोष्टीची. पाच दहा खर्च होतील पण—"

" पाच दहा तरी आणू कुठले? सावकाराचा खड भरता भरता टेकीस आलो आहें. बोलून चालून आपण गरीब—"

" नि म्हणूनच वाटेल त्यानें आपल्याला दम द्यावा नाहीं?"

" जाऊं द्या ते. आपण आपलं धर्मान—न्यायान वागाव. खर खोट पाह्यला देव आहेच."

" ते काहीं नाही भोईर. जिथ तिथ असा मऊपणा नाहीं बरा. तुम्ही पैशाकडे बघू नका. हवेतर मी देतो तुम्हाला ते उसने. पण तुम्हीं असे उगी राहू नका. गय करून नाहीं उपयोगी असल्याची. चागली शिक्षा होईल त्याला. शिवाय तुमचे खर्चाचे पैसेहि मिळतील तुम्हाला त्याच्याकडून. "

दाजीबाचे म्हणणे रामजीला थोडे पटले, व आपण नुसते मुग गिळून स्वस्थ बसता नये असे त्याला वाटू लागले.

दुसरे शेजारीपाजारीहि त्याला तेच सागू लागले. शेवटीं दुसरे दिवशी सकाळीं बैगणपूराला जाऊन फौजदारापुढे फिर्याद देण्याचे त्याने ठरविले. दाजीबाने त्याला सर्व माहिती व लागेल ती मदत देण्याचें कबूल केले.

* * *

दुसरे दिवशी सकाळीच देवाचे नाव घेऊन रामजी फौजदार कचेरींत जाण्यासाठीं बैगणपूरला निघाला. दाजीबानें त्यास बरोबर येण्याचें कबूल केले होते, पण एकाएकी त्याच्या कमरेत उसण भरल्यामुळें त्याला तें शक्य झाले नाहीं.

रामजीला एकटे जाणें जिवावरच आलें होते, पण करतो काय बिचारा ! आता काय होईल ते होवो, पण माघार घ्यायची नाहीं असा निश्चय झाला होता त्याचा.

तरी तो थोडासा डगमगलाच. कशाला या भलत्या भानगडीत आपण पडतों आहो असे त्याला क्षणभर वाटल्यावाचून राहिले नाही.

पाचएक तास चालून गेल्यावर सुमारे पावणेबाराला रामजी बैगणपूरला आला. ज्याला त्याला विचारीत विचारीत बिचारा एकदा फोजदार कचेरीपाशी आला.

आता त्याच्या छातींत धडधडूं लागले होते. असेच परतून घरचा रस्ता धरावा असें त्याच्या मनाला क्षणभर वाटलेहि.

इतक्यात त्याची गोंधळलेली स्थिती पाहून जवळच उभा असलेल्या शिपायाने त्याला दम दिला,—

" ए बदमाष, क्या देखता है ? इधर आव. "

बिचारा रामजी या पहिल्याच सलामीने भेदरून गेला अगदी.

रडत रडत त्याने आपली सर्व हकीगत त्याला सांगितली. शिपायाने ती सर्व ' फौजदारा'च्या रुबाबाने ऐकून घेतली व त्याला एकाद्या गुन्हेगाराप्रमाणे ढकलीत ढकलीत फौजदारासमोर नेले.

" साहेब, माफ करा. मी काहीं केलं नाही. दगडूपाटलान मला विनाकारण मारलं. माझा नवा बैल—"

" चुप ! बेवकूब साला ! " जवळच असलेल्या जमादारानें गर्जना केली, " नीट सांग काय खरं असेल ते. "

रामजीला वाटले, कुठून झक मारली आणि या फंदात पडलों !

शेवटीं फौजदार साहेबांनी त्याला तेथेच बसावयास सांगून तें घरीं जाण्यास निघून गेले.

रामजी बिचारा तसाच बसून राहिला. भीतीनें व भुकेनें त्याच्या-वर दुहेरी हल्ला चढविला होता.

अगदी थिरमिरला होता त्याचा जीव ! फौजदार साहेब परत आल्यावर त्यांनी त्याची फिर्याद लिहून घेतली व त्याला निघून जाण्यास सांगितले.

रामजीनें एक सुटकेचा निःश्वास सोडला.

बाहेर मघाचा शिपाई होताच सावजाची वाट पहात ! रामजीला त्याने खुणेनें जवळ बोलावले.

" क्यँव दोस्त, कुछ चहापानी ? त्यानें चिरीमीरीसाठीं राम-जीपुढे हात पसरलाच.

रामजीवर केवढे उपकार केले होते त्यानें !

घरून बाहेर पडताना जवळ असावे म्हणून एक रुपया व एक

अधेली इतके पैसे त्यानें एका फडक्याच्या टोकाला बाधून बरोबर घेतले होते.

रामजीनें त्याच्या हातावर अधेली काढून ठेवली.

‘ चोराची लगोटी ’ म्हणून शिपायानें तेवढ्यावरच समाधान मानले !

बिचारा रामजी रखडत रखडत घराची वाट चालूं लागला.

सकाळीं येताना त्याने शिळ्या भाकरीचा एक तुकडा खाल्ला होता तेवढाच ! त्यावर अन्नाचा लेश गेला नव्हता त्याच्या पोटात !

पण त्याच्या हे ध्यानीहि नव्हते. त्याला सारखी घराची ओढ लागली होती.

घरीं काय चालल असेल ? पोर लहान,—जनावर आहेत—त्याना पाणी दाखविल असेल का ? नवा बैल—ढवळ्या ओढाळ आहे. कुठ कुणाच्या जागेत शिरला नसेल ना ?—पाणी जवळ येतय्—राब करायूचा आहेच—कुडवणीच काम अजून किती तरी राह्यलय् ” अशा प्रकारचे विचार एकामागून एक रामजीच्या मनामध्ये येत होते.

शेवटीं रात्रीं नवाच्या सुमाराला एकदा तो घरीं येऊन पोंचला. चेहरा उतरला होता त्याचा. कसेबसे चार घास पोटात कोंबून तो अंथरुणावर पडला. डोळ्याला डोळा लागेना त्याचा. पहाटेच्या सुमाराला त्याला जराशी गुंगी आली. पण सकाळची कचेरी, फौजदार शिपाई याच्याशिवाय काहीं दिसत नव्हते त्याला स्वप्नात.

पाच सहा दिवसानी दगडूला रीतसर समन्स लागलें. आणखी चारच दिवसानी खटल्याची तारीख होती.

* * *

अखेर खटल्याचा दिवस उगवला.

आदले दिवसापासूनच रामजीचा धाकटा मुलगा तापाने बेफाम

आजारी झाला होता. आता त्याचा ताप थोडा कमी झाला होता, पण तो काही बापाला आपल्या जवळून उठूं देईना.

बिचारा रामजी मोठ्या पेचात पडला. आज त्याला कोर्टात हजर व्हायला पाहिजे होते.

त्याच्या बायकोने मुलाची कशीबशी समजूत करून ती अडचण दूर केली.

पायाने जाऊन येवढा पल्ला वेळेवर गाठणे शक्य नव्हते म्हणून सकाळीं नऊ साडे नऊच्या सुमारास बैंगणपुराकडे जाणाऱ्या मोटारनेच जायचें त्याने ठरविले.

पण मोटार भाड्यासाठी बारा आणे व अर्डी अडचणीसाठी एकादा रुपया येवढे पैसे जवळ असणे जरूर होतेच, पण रामजी-कडे तर चार आणेसुद्धा नव्हते.

दार्जीबाने एक दोन रुपये त्याला उसने देण्याचे कबूल केले होतेः पण आज सकाळींच त्याचे दुसऱ्या गावीं जाणे झाल्यामुळे रामजी त्याच्या घरीं जाऊनहि काही उपयोग झाला नाही.

शेवटी त्याने पुनचद शेटजीस दोन शेकडा पेढ्याचे मोल पडत्या भावाने विकून आठ रुपये आणले.

मोटार गाठण्याची घाई झाल्यामुळे रामजीला न्याहरी देखील करता आली नाही. बायकोने त्याचेबरोबर देण्याकरिता एका फडक्यात चटणी भाकर बाधून ठेविली होती, पण गडबडींत तो ती तशीच विसरून निघून गेला.

दगडू पाटलाने खटला चालविण्याकरिता वकील केला आहे, तेव्हा आपली बाजू खरी असूनहि आपण हरणार अशी रामजीला भीति वाटू लागली होती.

कचेरीच्या आवारात गेल्यावर रामजीकडे एका कज्जेदला-लाची नजर गेलीच !

" काय पाटील कुठल्या गावचे ? " त्याने रामजीची विचार-पूस सुरू केली.

रामजीने त्याला आपली इत्थभूत हकीगत सागितली.

" मग, वकील केल्यावाचून काय होणार आहे ? " भीतीने रडकुडीस आलेल्या रामजीस त्याने आणखी घाबरवून सोडले.

" पण वकीलाला किती पैसे लागतील ? मी गरीब आहे. "

" ते तुझ तूच पहा बुवा. आहे हे अस आहे. हो ! पटकन् केस उलटायची नि गळ्यात तगड्या यायच्या ! "

" पण माझ्याजवळ अवघे सव्वासहाच रुपये आहेत. नि—"

" बर मी पहातों थोडा प्रयत्न करून सवडीत एकादा वकील मिळतो का. पण— "

केवढ्या पेचात पडल्यासारखे दाखविले त्याने रामजीला !

फक्त चारच आणे जवळ ठेवून सहाहि रुपये रामजीनें त्याच्या हातावर ठेवले.

लवकरच एका सुतर्की चेहऱ्याच्या वकीलाशीं त्याची गाठ पडली.

रामजीला आता बराच धीर आला होता. त्याला वाटले कीं आता आपण खास जिकू !

पण त्या दिवशीं त्याचा खटला चाललाच नाही.

'साहेबा'नीं त्याकरिता आणखी आठ दिवसानतरची तारीख नेमली.

वकीलाने रामजीला फिरून येतेवेळीं आणखी दहा रुपये बरोबर आणण्यास बजावून सागितले.

* * *

यानतर दोन तीन अशाच तारखा लागल्या पण खटला काहीं चालेना. रामजी कटाळून गेला अगदीं. पैशापरी पैसा जाऊन

कामाचा पत्ताच नाही. या खटल्यामुळे रामजीला बरेच कर्ज झाले. वकीलाची पैशाची मागणी सारखी चालू होतीच.

शेतीचे काम अद्याप पुष्कळ व्हायचे राहिले होते. तशात त्याची बायको आजारी पडली. अगदीं नाइलाज झाला बिचाऱ्याचा.

रामजीने पैसे उसने मागितल्या दिवसापासून तर दाजीबानें त्याच्या घरचे नावच टाकले. फुकटचा सल्ला देण्याचेहि जीवावर येऊ लागलें त्याच्या.

एक दिवस रामजीने दाजीबाच्या घरीं जाऊन त्याची गाठ घेतलीच.

" दाजीबा, काय करायच आता पुढ ? " त्याच्याकडे दीनपणे पाहात रामजीने म्हटले.

" अहो, असे कचरता काय ? वकील केला आहे ना ? मग झालें तर. "

" ते खर पण किती दिवस चालायच हे ? उसन पासन करून वकीलाची भर करतोय्, तरी त्याच आपल तोंड उघडच ! नसती पीडा मागें लागल्यासारखं झालयू बघा ! सगळीं कामं तशीच पडलीत, घरीं कारभारीण आजारी आहे नि तशात उद्या तारीख आहे करू तरी काय ? "

" नि उद्याच निकाल लागेल असहि म्हणता येत नाही. "

" हो तेहि आहेच. म्हणून—"

" मग अस करा—वाटलं तर, केस काढूनच घ्याना. राजीनामा द्यावा लिहून कीं झाल "

अजूनहि फिर्याद काढून घेता येईल हे समजताच रामजीला केवढा धीर आला.

पण यासाठीं दहावीस खर्च करावे लागतील ह. फौजदार

आहे; शिपाई आहे, कारकून आहे,—हजारजण आहेत. त्याच्या तोंडावर काहींतरी फेकायला पाहिजेच ना ? ”

काय वाटेल तो खर्च येवो पण एकदा या भानगडींतून बाहेर पडायचे असा रामजीने निश्चय केला.

शेवटीं पैशासाठीं रामजीने आपला ढवळा बैल दाजीबाच्या मध्यस्थीने एकुणचाळीस रुपयास रानगावच्या पाटलास विकला.

बैल दुसऱ्याच्या स्वाधीन करताना लहान पोरासारखा रडला बिचारा ! पण त्याखेरीज त्याला गत्यतर नव्हते.

दुसऱ्या दिवशी रामजी भीत भीत फौजदार कचेरींत गेला. त्यावेळीं फौजदार साहेब तेथे नव्हते.

टेबलावर तंगड्या टाकून खाकी विडीचे झुरके घेत जमादार खुर्चीत बसला होता.

“ साहेब,—मी—” रामजीने थरथरत म्हटलें.

“ काय आहे ? ” त्याच्याकडे भिवया चढवून तिरस्काराने पाहात जमादार खेकसून म्हणाला.

“ पाया पडतों साहेब. मला फिर्याद काढून घ्यायची आहे. राजीनामा द्यायला मी तयार आहे—”

“ हॅट्, ते आता काहीं चालणार नाही. राजीनामा द्यायला तू तयार असशील; पण तुला तसं करू द्यायला आम्हीं राजी नाहीं ना ! ”

“ पण साहेब—”

“ लाथ मारीन. बेवकूब ! विचार नाही केला आधीं ? कोर्ट म्हणजे काय वाटत तुम्हा लोकाना ? ”

“ पण, साहेब, दया करा गरीबावर इतकी. मी आपले उपकार फुकट नाहीं—

“ चूप ! ”

शेवटीं जमादाराच्या हातापाया पडून फौजदारसाहेब आल्यावर रामजीनें कशीबशी फिर्याद काढून टाकण्याची व्यवस्था केली.

पुरते रक्त शोषण करण्यापूर्वी सावज हातचें सुटल्याबद्दल वकीलसाहेबास चुटपूट लागली.

दगडू पाटलालाहि रामजीप्रमाणेच कोर्टाच्या पायरीचा इंगा समजल्यावाचून राहिला नाहीं.

तिकडच्या पश्चात् मी माझ्या येशाला कसा वाढविला अन् त्याला कस शिक्षण दिल ते माझ मला ठाऊक कीं त्या एका परमेश्वराला ठाऊक ! माझ्यावर हा प्रसग कोसळला तेव्हा येशा होता असेल तेरा चौदा वर्षांचा. इग्रजी तिसरी यत्ता शिकत होता वाटत तो त्यावेळीं. जवळ शिल्लक काहीं फारशी नव्हती, पण शेताच भात मात्र पोटापुरत येत असे आम्हाला.

गोविदराव—माझे सख्खेभाऊ—आमच्यासाठीं फार कष्ट घेत बिचारे. शेताचा वसूल आणायचा, येशाला स्कॉलरशिप—कुठं दुसरी मदत मिळवून द्यायची हे सर्व तेच करीत.

पुढे येशा चागला एकदोन विषयात पहिला येऊन मॅट्रीकहि पास झाला. माझ्या मनात आता त्यान कुठतरी एकादी पाच-पचवीस रुपयाची नोकरी धरावी अस होत व एकदा गोविदराव आमचेकडे आले असता मी त्याना तस म्हटलंहि. पण त्याना काहीं ते पटल नाहीं. ‘ चागल्या दोन स्कॉलरशिपा मिळाल्या आहेत. जाऊ दे त्याला कॉलेजात. आजच काय त्याच्या नोकरीवाचून अडलय् अस नाही. ’ अशी त्यानीं माझी समजूत केली. मी तरी त्यावर काय बोलणार ?

यानतर येशा कॉलेजात जाऊं लागला. त्याला स्कॉलरशिपा मिळत होत्याच. शिवाय तो शिकवण्या वगैरे करूनहि चार पैसे

मिळवीत असे. यातच त्याच्या शिक्षणाचा खर्च परभारे भागत असे. अशा रीतीनं जवळजवळ चार वर्षे निघून गेली.

आता येशा बी. ए. पास झाला. याच सुमारास त्याला एकदोन ठिकाणच्या मुलीसुद्धा सागून आल्या होत्या. मी त्याबद्दल त्याच्याकडे थोडस बोलण काढलहि, पण त्यान तिकडे फारस लक्ष दिलंच नाही.

परीक्षा पास झाल्यावर येशान ठिकठिकाणी अर्ज खरडून टाकले. पण नोकरी मिळण्याच काहीं चिन्ह दिसेना. गोविदरावहि त्याच्या नोकरीसाठीं आपल्यापरी खटपट करीत होते. पण ते तरी काय करणार नोकऱ्याच नाहींत कुठ तर ?

शेवटीं मोठ्या खटपटीनं त्याला एका इग्रजी शाळेत मास्तरकी मिळाली. शिक्षणाच्या मानान पगार मात्र काहीं फार नव्हता—पचेचाळीस रुपयेच फक्त. बर तेवढा तर तेवढा.

अकराला येशाची शाळा. तेव्हा सकाळची दुसरीं काम उरकून साडेदहाला जेवण करायच. नंतर उष्टं खरकट, भाडी धुणी—जिकरीला येत असे माझा जीव हे सगळ करता करता. येशा भाड्याधुण्यासाठीं मोलकरीण ठेवू म्हणत होता; पण मीच त्याला, ' काही नको मोलकरीण. " म्हणून सागितल. कशाला हवीय् मोलकरीण ? धड वेळेवर कामाला येणार नाहीं, अन्—"

पुढें पुढे मला काही घरातलं काम वेळेवर उरकेना. येशाला शाळेत जायला उशीर होऊं लागला; एक दिवस तर त्याला जेवल्याशिवाय शाळेत जावं लागलं. मी तरी काय करू त्याला ?

गोविदराव याच सुमारास आमचेकडे आले होते. त्यानीं हे सर्व पाहिलं. मागे एकदा त्यानीं येशाच्या लग्नासंबंधान माझ्याकडे गोष्ट काढली होती. आता तर त्यानीं प्रत्यक्ष येशालाच स्पष्ट सागितल.

" यशवंत, आता तुला चागली नोकरी लागली आहे; पगारहि

काही अगदींच कमी नाही. दहिंसरचे दादासाहेब दाभोळकर आपली मुलगी तुला करायला सागत आहेत. सद्गुणी आहे पोर. मग कायते पाहा बुवा आता. आईला—म्हातारीला तरी आता घरातलं उरकत का ? ”

“ नाही रे बाबा माझ्यान होत आता. पण काय करणार ? ”— मी म्हटल.

शेवटीं एकदा येशा लग्नाला तयार झाला. तो काही माझ्या-बाहेर नव्हता.

गोविंदराव ताबडतोब दाभोळकराकडे जाऊन पुढल्या कार्यास लागले. आणि पुढल्याच मार्गशीर्षात दाभोळकराची इंदू माझी सून होऊन ‘ लक्ष्मी ’ या नावान आमच्या घरात वावरूं लागली.

* * *

सूनबाई आल्यापासन मला आता आकाश ठेगण होऊं लागल. मला वाटे, माझ्यासारखा सुखी प्राणी दुनियेंत नसेल. माझा येशा आताच्या काळातला, एवढा बी. ए. झालेला, पण कसा अगदीं माझ्या अध्या वचनात ! सूनबाई चागली शिकली-सवरलेली, शिवाय थोरामोठ्या घराण्यातली, पण किती मर्यादशील मग आणखी काय हवं होतं मला ?

शेजारीपाजारी, आला गेला—जो भेटेल त्याच्याकडे मी सुन-बाईच्या गुणाचे गोडवे गात असे. त्यावर लोकहि जेव्हा, “ चागली आहे हो सुनबाई तुमची—झाकल्या तोंडाची आपली. ” अस म्हणत तेव्हातर माझ्या अंगावर मूठभर मास चढायच.

परतु पुढे पुढे मला जगाचा उलट अनुभव यायला लागला. तेच लोक मला पहाताच कपाळाला आठ्या घालू लागले. इतकेच नाहीं तर त्याच्यात माझ्याविषयीं कुचेष्टा होऊ लागली. दुसऱ्याचं चागलं पहावतच नाहीं कुणाला—आणखी काय ?

आता मला बराच विसावा मिळू लागला होता. सकाळ सध्याकाळच जेवण सुनबाईच करीत असे. भाजीवगैरे चिरण, तसलच एखाद किरकोळ काम मी पहात असे. शेजारी—कुणाकडेच मी हल्लीं फारशी जातयेत नसे. दुपारीं कुठ हरीविजय किंवा रामविजय वाचायच, सध्याकाळीं देवदर्शन, कुठ पुराण प्रवचन असल तर तिकडे जायच—एकदरीत असा होता माझा रोजचा कार्यक्रम.

सूनबाई पडली शिकलेली नि तशात आताच्या काळातली ! ती का पोथ्यापुराण वाचणार ? कादबऱ्या, मासिक, कुठ गोष्टींचीं पुस्तकं ह्याची तिला आवड. अलीकडे तिच्यासाठीच येशानं एक-दोन मासिक सुरू केली होतीं.

घरातल्या कामामुळ तिला वाचनाला फारसा वेळ मिळत नसे. म्हणून तिन येशाला सागून भाड्याधुण्यासाठी एक मोलकरीण ठेवली होती.

माझा कार्यक्रम होता तोच चालू होता, पण सुनबाईच्या कार्यक्रमात मात्र आता बदल पडू लागला. अलीकडे कधींमधीं ती सध्याकाळीं येशाबरोबर हवा खायला जाऊ लागली. नट्टापट्टा करण्यात तिचा बराचसा वेळ जाऊ लागला.

तिच्या सौभाग्यवस्तूंच्या पेटींत स्नोपावडरींच्या डब्या दिसू लागल्या.

मला हें बिलकूल रुचेना, पण आताच्या काळात हे अस चालायचच् अस म्हणून मी मूग गिळून स्वस्थ बसत असे.

सकाळीं उठल्यावर दात घासण्याकरिता मी शेणींची राखुंडी किंवा तुसाची मशेरीच घेत असे. पण सूनबाईला मात्र त्यासाठीं ब्रश नि कसलस पावडर मलम लागत असे. मोठी मड्डमच किनई !

आतां मला कळून चुकल कीं सूनबाई वाटते तशी नाहीं.

आपण जर तिच्याशी असच नरमपणान वागलों तर ती खात्रीन डोक्यावर मिरीं वाटील आपल्या.

पण मला राहून राहून नवल वाटायच ते येशाच. तो हें सार पाहूनसुद्धा काहींच कस बोलत नसे बायकोला !

येशाला चहा नेऊन दिल्यावर सूनबाई आपली तिथंच त्याच्या-बरोबर इंग्रजींत गप्पा करीत राह्यची. मला हें पाहून कससच वाटायच. काय मेली हीं आताचीं माणस तरी ! काही भीडमर्यादा वडील माणसाची ! कधीं कधीं मी सूनबाईला रागानेंच म्हणे, " लक्षुमी, काय गप्पा करीत राहिली आहेस ग ? शाळेला उशीर होतो ना मग येशाला ? "

त्यावर, " हू ! काही नाहीं होत उशीर. " अस ती फणकाऱ्या-नच उत्तर देई.

शब्दान शब्द वाढतो. उगीच लोकाना काय मजा दाखवायची, म्हणून मी आपली चूपच राहात असे.

कधीं कधीं सध्याकाळच्या वेळीं सूनबाई अशाच दुसऱ्या कोणी कोणी साळकाया माळकाया गोळा करून टेनीस कीं फेनीस, काय म्हणतात ते, खेळायला जायची. मी तर हे पाहून थक्कच व्हायची !

गावात कुठ व्याख्यान असलं तर सूनबाईन ते कधीं चुकवू नये. जस काय या बाईसाहेबावाचून व्याख्यान व्हायचच नाहीं. एकदा तर कुठल्याशा व्याखानात, म्हणतात, बाईसाहेब उभ्या राहून बोलल्यासुद्धा ! बर दिसत का बायकाच्या जातीला हे ? काय हा भलताच धीटपणा !

* * *

येशा बायकोला शिनिमाला घेऊन जायचा. मी त्यानं जाऊ नये म्हणत नाहीं. जाव. पण बरोबर बायको कशाला ? बरं शिनिमेतरी

किती पाह्यचे नेहमीं नेहमीं ? उभ्या जन्मात मी काय तो 'तुकाराम' पाह्यला. तो देखील शेजारच्या रमाकाकूनी आपल्याबरोबर येण्यासाठीं अगदींच गळ घातली म्हणून.

शिनिमेवाले काय, आपल पोट भरायला येतात, पण आपण आपल्या स्थितीचा विचार करायला नको का ?

दारात भाजीवाली येत असे. सूनबाई आपली भाजीवाली सागेल ती किमत टाकून भाजी विकत घ्यायची. मीं जर कधी 'कशाला हवीय येवढी महाग भाजी आपल्याला ?' अस म्हटल तर तिला ते खपत नसे. तिला वाटे, आपला नवरा कमावतोय, आपण हवातसा खर्च करू, या म्हातारीची पीरपीर कशाला ?

पुढें पुढें तर सूनबाईला आपल्या ससारात माझी अडगळ होऊं लागली.

मी म्हणजे कुणीच नाही. माझी काही किमतच वाटेना तिला. यामुळें लवकर डोळे मिटतील तर बर, अस वाटायला लागल मला.

माझा येशा येवढा माझ्या सागणी म्हणणींतला—पण तोहि अलीकडे बायकोच्या ओंजळीन पाणी पिऊ लागला. अगदींच कसा बाईलबुद्धा बनला तो !

सूनबाई काय, दुसऱ्याच रक्त ते ! पण येशा माझाच मुलगा ना ? त्यान नको का माझ्याबद्दल काहीं विचार करायला ?

एक दिवस काय झाल, दुपारीं मी हरिविजय कीं कसलसं पुस्तक काढायला माझं फडताळ उघडलं. आत पहाते तर काय—अश्शीं एक दोन जाड जाड इग्रजी पुस्तकं आपलीं ठेवलेलीं होती माझ्या पोथ्यावर. मी समजलें, हे सूनबाईच काम !

"लक्षुमी" मीं जरा रागानंच तिला हाक मारली.

अंगाला आळोखे पिळोखे देत सूनबाई माझ्यासमोर आली. हातात कसलंसं टपालातून आलेलं चोपडं होतं तिच्या.

“ हे ग काय लक्षुमी ? तुझी हीं इग्रजी पुस्तकं कशाला इथ माझ्या पोथ्यावर ?

यावर सूनबाईन—असा कसा तो—एकदम मानेला हिसडा देत म्हटल,

“ तिथ राहिलीं म्हणून काय झाल ? तुमच्या पोथ्या बाटल्या वाटत ? ”

“ लक्षुमी, लक्षुमी कोणाला सागते आहेस हे अवदसे ? ” माझ्या अंगाचा नुसता भडका उडाला होता.

“ हे पाहा, मला तुम्ही ‘ लक्ष्मी, लक्ष्मी ’ करून हाक मारू नका. नीट ‘ इदू ’ अस माझ्या माहेरच्या नावान हाक मारा; नाहींतर त्याच्यासारख ‘ ‘निशा’च म्हणत जा. मला लक्ष्मी नाव आवडत नाहीं.

तिच्या समोर कपाळ आपटून प्राण द्यावा अस मला वाटू लागल. काय ऐकते मी हे ? येशा हिला ‘ निशा ’ अशी हाक मारतो ! गेला—फुकट गेला माझा येशा !

या पुढें मी सूनबाईशीं बोलणच कमी केल. उगीच कामापुरत बोलायच. तिला तरी माझी कुठ पर्वा होती ?

येशातर अलीकडे एकसारखा ‘ निशा, निशा ’ करीत नाचायचा बायको भंवती.

एक दिवस मी त्याला विचारलच,

“ येशा, एकसारख ‘ निशा निशा ’ करीत असतोस तें निशा-बिशा करून येतोस कीं काय ? अरे जरा तरी भीड-मर्यादा धर या म्हातारीची. ”

त्यावर तो निर्लज्जासारखा हसून म्हणतो कसा,

“ आई, त्यात काय झाल ? राम नव्हता का आपल्या पत्नीला ‘ सीता ’ अशी हाक मारीत ? देवादिकानीं केलं ते करायला

आपल्याला काय हरकत ? आता तर हें सुधारणा युग आहे ! ”

याच्याशीं काय हुजत घालायची म्हणून मी गप्पच राहिलें.

याप्रमाणें दिवसामागून दिवस व महिन्यामागून महिने मागें टाकीत सूनबाईच्या ससारात मी आपल कटाळवाण आयुष्य घालवीत होते.

* * *

मला आता एक नातू झाला होता. गुलाम माझ्या येशासारखाच चुणचुणीत होता. त्याच नाव ठेवल होत ‘ शरद्कुमार ’ काय हीं हल्लींचीं नाव ! माझ्या मनात त्याला चागल ‘ गोविद ’ नाहींतर ‘ विष्णु ’ अस देवाच नाव ठेवायच होत. पण माझ ऐकतो कोण म्हातारीच ? असो.

हल्लीं माझा बहुतेक वेळ कुमारला घेण्याखेळविण्यात जाई.

कुमारमुळेच मला आताशा आयुष्यात काही ‘ राम ’ आहे अस वाटायला लागल होत. कुमारचे हसरे डोळे, बोबडे बोल माझ्या अंतःकरणातील अंधार नाहीसा करून माझ्या चित्ताला प्रसन्नता आणीत असत.

सूनबाईनं कुमारला साभाळण्यासाठीं एक पोरगा नोकरीस ठेवला होता. तस पाहिल तर त्याची काय जरुरी होती ? पण नाहीतर लोकानी आम्हाला ‘ श्रीमत ’ कस म्हणाव ?

हल्लीं आमच्याकडे एक बाजाची पेटी आली होती. ती घेऊन सूनबाई आपली उठल्यासुटल्या शिनिमातलीं गाणीं गात बसायची. पहिल्या पहिल्यान मीं तिकडे दुर्लक्षच केलं. पण जेव्हा याचा कळस झाला तेव्हा एक दिवस येशाला म्हटल,

“ येशा, तुला बर दिसत हे ? बायकोला काय शिनिमात धाडणार आहेस ? ”

“ आई, तुझं आपल काहीतरीच बोलण ! वाजवीना का पेटी.

मी मुद्दाम कुमारला खेळविण्यासाठींच आणली आहे ती." येशा म्हणाला.

"मग सूनबाई तर स्वतःचाच जीव खेळवीत असते त्या पेटीबरोबर सदान्कदा !"

"खेळाडूवृत्ति आहे तिची जरा—"

"ठीक आहे. पण अशा खेळाडूवृत्तीन खेळखडोबा होईल ना ससाराचा !"

म्हटल, हे असच चालायच ! काय करायूचय आपल्याला ? आपण आज आहो नि उद्या नाहीं. आपण काही बोल्रूच नये हे उत्तम.

एका रविवारी दुपारीं सूनबाई येशाच्या खोलीत त्याच्या खुर्चीला खुर्ची लावून कसलासा अंक चाळीत होती.

खोलीच्या दाराजवळच्या कोपऱ्यातील कपडे वाळत घालण्याची काठी आणायला मी पुढें झाले तोंच माझ्या कानी खालील शब्द आले—

"यशवत, जरा घ्याना कुमारला. पहा कसा मला वाचायला देत नाही लबाड."

सूनबाईच्या तोंडचे शब्द ! केवढा धक्का बसला मला ते शब्द ऐकून ! ही बाई आहे का कोण आहे ? बेधडक आपल्या नवऱ्याला नावान हाक मारते ! 'सुधारणा युग' आहे हें ! कसल्या सुधारणा ह्या ! मेला देवदेखील हल्लीं सुधारकच बनलेला दिसतोय्, नाहीतर त्याला हें कस सहन झाल असत सगळ ?

आम्ही नव्हतों आमच्या सास्वाच्या सुना ? आम्हालासुद्धा त्याच्या सगळ्याच जुन्यापुराण्या वागणूकी आवडत होत्या अस नाहीं, आम्हीहि सुधारकपणानं वागत असू, पण आमच्या सुधारणा अशा घेडगुजरी नव्हत्या !

*  *  *

त्या दिवशीं माझा शनिवार होता. ओसरीवर सावळ्या कुमारला खेळवीत होता. उपासासाठीं मला चार केळीं नि थोडेसे साबुदाणे आणायचे होते; म्हणून मी सावळ्याला बाजारात जाण्यासाठीं हाक मारली,

" सावळ्या, रे सावळ्या "

सावळ्या एक नाहीं नि दोन नाहीं. मी जरा रागानच त्याच्याजवळ जाऊन म्हटल,

" सावळ्या, ऐकू येत नाहीं रे तुला ? बाजारात जाऊन येवढ घेऊन ये पाहू."

सावळ्या बाजारात जायला काकू करू लागला, तेव्हा मी त्याला म्हटल,

" दे कुमारला माझ्याकडे नि जा पाहू आता पट्कन."

" पण मला बाई राग भरतील त्या." तो इकडे तिकडे पाहून जरा चाचरतच म्हणाला, " त्यानी मला बजावलंय्, तू आपल तुझ काम करीत जा, कुणाच—दुसऱ्याच ऐकू नको काहीं."

फार वाईट वाटल मनाला हे ऐकून. छान बर सुनबाई हे !

नतर मी काही त्याला बाजारात धाडल नाहीं. देवखोलींत जाऊन स्वस्थ पडून राहिले आपली.

गत काळातल्या आठवणीवर आठवणी येऊन डोळयास धारा लागल्या होत्या सारख्या.

त्या दिवशी मला चागलाच निर्जली उपास घडला. यापुढें मला वीटच आला सगळ्याचा. मला या घरात राहणच नकोस होऊन गेल. वाटे, आपल कुठ तरी दूर तीर्थावर जाऊन उरलेल आयुष्य देव, देव करीत घालवाव. सुनेच्या नशीबाची सून नि मुलाच्या नशीबाचा मुलगा ! काय करायचय् आपल्याला त्याच्याशीं ?

शेजारचे शाताराम बापू आपल्या आईला नाशिक पढरपूराकडे

नेऊन आणणार होते. मीहि त्याच्याबरोबर जाण्याचा निश्चय केला. बापूनी मला आपल्याबरोबर नेण्याच मोठ्या आनदान कबूल केल. मी त्याना म्हणाले,

" बापू, मला तुम्ही पढरपूरला नेऊन तिथ सोडा फक्त. माझा काही इकडे परत यायचा विचार नाहीं. "

त्यावर ते गमतीन म्हणाले,

" म्हणजे ? रखमाकाकू, तुमचा काय कान्होपात्रेसारखा विठ्ठलाच्या पायावर देहविसर्जन करायचा विचार आहे वाटतं ? "

" मग काय वाईट होईल तस झाल तर ? पण तितकी पुण्याई कुठ आहे आमच्या गाठीं " मी म्हटल.

*   *   *

मी माझा बेत रहीत करावा म्हणून येशा मला परोपरीन विनवीत होता.

" आई, उगीच असा त्रागा काय करावा माणसान ? तुला काहीं त्रास का आहे इथ ? येत्या नाताळात मी तुला नेऊन आणीन नाशिक पंढरपुराहून हवतर. "

त्यावर सूनबाई काय म्हणते,

" जाऊ द्या ना त्याना. इच्छेच्या आड कशाला यायच आपण कुणाच्या ? येतील परत तिकडे कटाळा आला की आपणच. "

मी त्याच्या बोलण्याकडे बिलकूल लक्षच देत नसे.

आज दुपारच्या गाडीन आम्ही निघणार होतो. सकाळपासूनच मला जरा अस्वस्थपणा वाटत होता. काय असेल ते असो, कुमारकडे पाहून मला चटकन हुदका येई. निष्पाप पोर ! त्याच्याकडे पाहूनच मला आपल्या करण्यात काहीं चूक होत नाहीं ना अस वाटत होत. क्षणभर तर माझ्या मनाला आपला बेत बदलूनच टाकावा असंहि वाटलं.

पण ज्या ठिकाणीं आपल्याला मान नाहीं, जिथ कुणाला आपली पर्वा नाहीं—तिथं रखडत राहाण्यात काय मतलब ! असा विचार करून मी आपल मन खबीर करण्याचा प्रयत्न करीत होतें.

प्रपचाचा मोह मोठा जबर आहे. हृदय घट्ट केल्यावाचून—मन बळकट केल्यावाचून माणसाची त्यातून कधीच सुटका व्हायची नाहीं.

दोन एक वाजण्याच्या सुमारास शातारामबापू दारात मोटार घेऊन आले. जरूर त्या सामानाच मी एक लहानस गाठोड केल होत. बापूनींच ते मोटारींत नेऊन ठेवल.

सावळ्या कुमारला घेऊन बाहेर खेळवीत होता. मी बाहेर पडताच सूनबाई व येशा दोघहि बाहेर आली. येशाचा चेहरा गोरामोरा झाला होता.

कुमार आपले चिमकुले हात हालवीत तोंडान ' अमं अम ' करीत होता.

मोटारीत जाऊन बसलें तेव्हा फिरून एकदा मला उमाळा आला.

येवढा दृढ निश्चय करूनहि चिमण्या कुमारकडे एकवार वळून पहाण्याचा मोह मला आवरता आला नाहीं.

इतक्यात मोटार चालू झालीच !



# हाडाचीं काडें ५

आपल्या झोपडीवजा घरासमोरील खळयात रचलेल्या भाताच्या उडव्याकडे जिवबानें समाधानानें पाहिले. काळजीनें निस्तेज बनलेल्या त्याच्या डोळयात यावेळीं विलक्षण तेज तरळू लागले होते.

आकाशातून डौलाने प्रवास करणारा निशानाथ भूतलावर सढळ हाताने सुधासिंचन करीत होता. दारासमोरील भाताच्या उडव्यामुळे जिवबाच्या घराचे रूप आज वैभव सपन्न दिसत होते.

आपल्या शेजारच्या स्नेह्याबरोबर बोलत यावेळी जिवबा खळ्यात बसला होता.

“ खरच रघू, कापणी झाल्यावर छातीवरल अर्धअधिक दडपण कमी झाल बघ. आता एकदा कापलेल पीक खळ्यात आल कीं सुटलो एकदाचा ! ” जिवबा शेजाऱ्याला सागत होता.

“ अरे तेही होईल. देवालाच सारी काळजी ! पण यदा पीक म्हणजे पीक आहे ह ! ”

“ अगदीं सोळा आणे ! नि म्हणूनच तर पुढ जगण्याची आशा आहे. गेल्यावर्षी हा घारा बैल घेण्यासाठी सावकाराकडून पन्नास रुपये आणले आहेत. ते देऊन आता मोकळं झालं पाहिजे. पुढचा भरवसा कुणी धरावा ? ”

“ खर आहे, बाबा ! आधीं सावकाराच्या जबड्यातून सुटल पाहिजे. ”

यानतर कितीतरी वेळ ते सुखदुःखाच्या गोष्टी बोलत बसले होते.

शेवटीं रात्र बरीच झाल्यामुळे रघू आपल्या घरीं जाण्यासाठी उठला. जिवबाहि घरात आला. समोरच त्याचीं मुले—जाई व किसन–निजली होती. मिणमिण तेवत असलेल्या दिव्याचा अंधुक मिचळसर प्रकाश त्याच्या तोंडावर पडला होता.

त्याचे निर्विकार नि निष्पाप चेहरे पाहून जिवबाच्या चित्तात खळबळ सुरू झाली. तो अथरुणावर पडला, पण त्याला झोप येईना. गतायुष्यातील बऱ्यावाईट अनुभवाचा चित्रपट त्याच्या अंतःचक्षूसमोरून सरसर सरकत होता.

आज किती वर्षे आपण व आपली बायको—नर्मदा––शेतात खपतों आहों, पण एक दिडकी तरी जवळ शिल्लक आहे का ? उलट गेल्यासालचे पन्नास रुपयेच सावकाराला द्यावयाचे आहेत. यंदा पीक चागल आल आहे म्हणून बर, नाहीतर, वर्षभर हाडाचीं काडं करावी नि निमुटपण सावकाराचा खड भरावा. खड भरून खाली पुरेस भात शिल्लक राहिल तर ठीक, नाहीतर कर्ज काढावं किवा अर्धपोटी राहाव. आपल्या नशिबी असलच जिण लिहिल असेल का ? मग पाठीवरून धान्याची पोती वाहाणाऱ्या जनावरात नि आपल्यात फरक तो काय राहिला ? आपण स्वतः पिकवितों; ती पाठीवरून वाहून नेतात—पण हे सर्व दुसऱ्या करिताच ! आपण इतके कष्ट करतो, धर्मान वागतो. आपली ही स्थिती का ? स्वतःबद्दलची गोष्ट जाऊ द्या. पण किसन नि जाई—देवाघरचीं रत्न ती ! त्याना त्याच्या हौसेसारखा एकादाहि जिन्नस आपल्याला कधीं घेता येऊ नये अ ! जाईन किती वेळा तरी आपल्या बोबड्या बोलीन आपल्याला वाळे आणण्याबद्दल सागितल असेल; किसन गरम बडीसाठी किती वेळा बालीश हट्ट धरून बसला असेल, पण—पण आपण दरवेळीं नवी नवी सबब सागून त्याची समजूत करावी ! हे असच चालायच का ? तें

काहीं नाहीं. यंदा चार दाणे अधिक हातीं आले तर कर्ज फेडून उरेल त्यातून मुलाना हौसेसारखे दोन जिन्नस आणून द्यायचे. आपण चिंध्या पांघरून राहू ...

*　　*　　*

दुसऱ्या दिवशी जिवबा सकाळी लवकरच उठला. बाहेर येऊन त्याने उडव्यावर नजर टाकली, पण कालच्यासारखे त्याच्या दृष्टींत समाधान नसून तीत भीतीची दाट छाया होती. कारण एकाएकी आकाश ढगानीं व्याप्त झाल्यामुळे आदल्या दिवशींच सृष्टीच हसरे स्वरूप पालटून जिकडे तिकडे औदासिन्य पसरले होतं. पूर्वेकडील क्षितीजावर मधून मधून विजेची चमक होती. एकदर लक्षणावरून लवकरच जोराचा पाऊस पडणार हे उघड दिसत होते.

जिवबा आता अगदी हतबुद्ध झाला होता. येणाऱ्या संकटास आता तोंड कस द्याव तेच त्याला समजेना.

शेतात कापून ठेवलेल पीक घरात न आल तर—तर काय ?

कल्पनाच करायला नको पुढची. खळ्यावरल्या उडव्यातून सावकाराचा अर्धा खडहि पुरा व्हायचा नाहीं. मग आपण बाधलेले मनातील मनोरे पार कोसळणार. कर्ज फेडायच दूरच, पण पुढें अन्नासहि मोताद व्हाव लागणार. मग आपली पोर—पण आता नुसत कपाळाला हात लावून काय होणार आहे. आल्या सकटाला तोड दिल पाहिजेच !

ताबडतोब शेतातील भात खळ्यावर आणण्यासाठीं व माणसें पाहण्यासाठीं जिवबा घराबाहेर पडला.

थोड्याच वेळात पावसाच्या सरीवर सरी कोसळू लागल्या; व लवकरच जिकडेतिकडे पाणीच पाणी होऊन गेले.

जिवबानें खूप प्रयत्न केला, पण त्याला एकहि माणूस मिळेना.

कोण येणार त्याच्याकडे ? जो तो आपल्या विवचनेंत; आपली कामें टाकून दुसऱ्याकडे कोण जाणार ?

निराश होऊन जड पावलानींच जिवबा घराकडे परतला.

उघड्या ओस्र्यावर जाई व किसन जोराजोरानें पडणाऱ्या पावसाच्या धारा पाहून आनदाने हुदडत होती.

“ येरे येरे पावसा। तुला देईन पैसा ॥ ”

अजाण मुलें ! त्याना काय कल्पना पावसानें केलेल्या अनर्थांची ! एक पैशाची लालूच दाखवून जाई पावसाला आणखी जोराने कोसळायला सागत होतीं !

“ बाबा, बाबा, खळयात किती पाणी तुंबलय हो ! आता त्यात आमी होड्या सोडणार. गमतच गमत—”

ओटीवर चढत असलेल्या आपल्या बापाच्या हाताला बिलगून जाई लडिवाळपणानें सागत होती.

जिवबानें वळून खळयाकडे पाहिले. त्यात तुंबलेले पाणी पाहून त्याच्या काळजाचें पाणी झाले.

तीन दिवस पावसाने कहर केला. जिवबा व नर्मदा यानी शेजाऱ्याच्या मदतीने शेतातील थोडेंसे भात कसेबसे खळयावर आणलें; पण बाकीचें तेथेच कुजून गेले.

आता पुढे काय करायचें, हा प्रश्न जिवबाला भेडसावू लागला. सावकाराचा खंड कोठून पुरा करणार ? बर उत्पन्न होणारं सर्व धान्य सावकाराला देऊन पुढ वर्षभर जगायच कशावर ?

जिवबाला काहीं उपाय सुचेना.

“ शेटजींच्याकडे जाऊन तुम्ही त्याना आपली अडचण नीट समजाऊन सागा. त्याच्या हातापाया पडून त्याना दया दाखवायला सागा. शेटजी काहीं अगदींच पाषाण नाहींत—” नर्मदेनें जिवबाला सल्ला दिला.

जिवबानेंहि विचार करून शेवटीं तेच ठरविलें.

*　　　*　　　*

भीत भीतच पायऱ्या चढून जिवबा ओटीवर आला. बापूसाहेब त्यावेळीं पाहुण्याबरोबर बिझिक खेळत बसले होते. आपल्या कुळाकडे त्यानीं सस्मित चेहऱ्याने पाहिलें.

" कोण—जिव्या ? आलास बैस बैस. "

फिरून ते खेळण्यात गुंग झाले.

एका बाजूस आपल्या नेहमींच्या जागीं जाऊन जिवबा बसून राहिला.

कुळानें खेड्याहून काय आणलें आहे हें पाहण्यासाठीं बापूसाहेबाची थोरली मुलगी एकवार बाहेर नजर टाकून गेली.

जिव्या, काय आणल आहेस आज खेड्याहून ? का नुसता हात हालवीतच आला आहेस ? " थोड्या वेळानें बाहेर येऊन तिने विचारले.

जिवबा थोडा खट्टू झाला.

" नुसते फुकटखाऊ मेले ! " ती पुटपुटत आत निघून गेली.

काहीं वेळाने बापूसाहेबाच्या धाकट्या मुलाने येऊन फर्माविले—

जिव्या, ही कुऱ्हाड घेऊन तेवढीं लाकड फोड पाहूं. "

" जिवबा मुकाट्याने उठला व लाकडे फोडण्यास गेला. येवढा दूरचा पल्ला चालून आल्यामुळे तो अगदी थकून गेला होता; पण त्याला त्या ठिकाणी स्वस्थ बसणें शक्यच नव्हते.

लाकडें फोडल्यावर तो फिरून आपल्या जागीं येऊन बसला.

याला फुकट बसून काय म्हणून खायला घालायचें असा विचार करून शेटजींच्या बायकोने त्याला परसात नेऊन माती खणण्याचें काम लाविले.

दुपारीं जेवणानंतर बापूसाहेब पाहुण्यासह माडीवर जाऊन

बसले होते. जिवबा शेटजी खालीं उतरण्याची वाट पहात ओटीवरच बसला होता.

संध्याकाळीं साडेचाराचे सुमारास बापूसाहेब खालीं उतरले.

" शेटजी—" जिवबाने बापूसाहेबास पाहून बोलण्यास सुरवात केली.

" अरे जिव्या—हें बघ, आम्ही आता फिरायला जात आहों. उद्या कायते पाहूं. " बापूसाहेब फिरायला जाण्याच्या गडबडींत होते.

" पण·शेटजी, मला आज घरीं परत जायला हवं होत...घरीं पोरं वाट पाहातील. "

" मला वेळ नाहीं आता थाबायला—" बापूसाहेब त्रासिकपणे म्हणाले.

जिवबा चूपच राहिला. शेटजीपुढें त्याचे काय चालणार ? सचित होऊन तो तसाच बसून राहिला. आता त्याचे विचारचक्र जोरजोराने फिरू लागले होते.

आपण आज केवढ्या आशेने शेटजीकडे आलों आहों पण शेटजी तर आपल्याशीं नीट बोलायलाहि तयार नाहीत. मग ते दया ती कशी दाखविणार ?

रात्रीपर्यंत जाई नि किसन आपल्या वाटेकडे डोळे लावून बसतील; व आपण गेलो नाहीं म्हणजे तीं किती निराश होतील ! नर्मदा आपली किती काळजी करील !—शेटजींना काय कल्पना याची !

रात्रीं बरीच थंडी पडली होती. जिवबाजवळ काहीं पांघरायला नव्हते. एक फाटके तरट अंगाखालीं घालून बिचारा कुडकुडत पडला होता.

*          *          *

डोक्यात माजलेल्या विचाराच्या काहुरामुळें व रात्रभर पडलेल्या थडीमुळें जिवबाला त्या रात्रीं स्वस्थ अशी झोंपच लागली नाहीं.

सूर्य क्षितिजावर येऊन जिकडे तिकडे सोनेरी प्रभा फाकली होती.

नुकतेच बापूसाहेब चहा वगैरे उरकून पाहुण्यासह ओटीवर येऊन बसले होते.

पाहुण्यासमोर शेटजींना आपली रडकथा सागावी कीं सागू नये असा विचार जिवबाला पडला होता, पण इतक्यात बापूसाहेबानीच बोलायला सुरवात केली.

"काय जिव्या, कशी काय हालहवाल शेतावरची? ह्या आताच्या पावसान थोडस नुकसान केल असेल, नाहीं?"

बापूसाहेब अनुकूल मुद्याकडेच वळत आहेत असे पाहून जिवबाला जरा धीर आला.

"थोडं कस? बरच नुकसान झाल आहे शेटजी. या पावसान तोडाजवळ आलेला घास काढून घेतला—बघा, गरीबाचा! त्याबद्दलच सागायला आज मीं आलो आहे." जिवबा चुटपटत म्हणाला.

"ह! ते मी आधीच ताडलं! तुम्हा लोकाची ही नेहमींचीच रड आहे रे!" बापूसाहेबाच्या कपाळाला यावेळीं आठ्या पडल्या होत्या.

यानतर जिवबाने त्याना सर्व परिस्थिती नीट समजाऊन सागितली; व यंदा निदान अर्धा खड तरी माफ करण्याची विनति केली. पण व्यवहारी बापूसाहेबाना त्याची बिलकूल दया येईना. उलट ते आता अतिशय चिडले होते.

"एक दाणाहि सोडणार नाहीं. चोर लेकाचे! यदा काय, म्हणे, पाऊस जास्त पडला; यदा पाऊस कमी पडला—काहीं ना

काहीं रड आहेच ! हें बघ जिव्या, तुला शेत लावायचं नसलं तर तें सोडून दे कस. मी ते दुसऱ्या एकाद्याला देईन लावायला. ”

यावेळीं जिवबा अगदीं रडकुडीस आला.

“ शेटजी असे निष्ठुर नका होऊं हो ! माझ्याकडून शेत काढून घेऊं नका. माझीं पोर लहान आहेत–त्याच्याकडे पाहून तरी येवढी दया करा—”

“ बर हे बघ, तुला यदा पुरा खड देता येत नसेल तर अर्धा दे. पण राहिलेली बाकी पुढल्या वर्षी दीड पटीन द्यावी लागेल. बघ पटत असल तर. ”

इकडे आड नि तिकडे विहिर अशी जिवबाची स्थिति झाली होती. शेटजींचें म्हणणें कबूल करण्यावाचून त्याला गत्यतर नव्हते; कारण नाहींतर शेटजी आपल्याकडले शेत काढून ते दुसऱ्याला द्यायला कमी करणार नाहींत अशी त्याला भीति होतीच.

“ हो ! पण गेल्या सालच्या रकमेचं काय ? व्याज तरी आणलं आहेस का आज ? ” बापूसाहेब आता दुसऱ्या मुद्याकडे वळले.

“ शेटजी, कशाला छेडता गरिबाला ! एक दिडकी देखील जवळ नाहीं हो हल्लीं. शेटजी, यदा निदान व्याजाची तरी सूट द्या हो ! ”

“ वा ! खासा न्याय ! म्हणजे मी काय कुबेर लागून गेलों कीं नाहीं ! अरे बाबा, पैसा काहीं झाडाला लागत नसतो. पैसा कमवायला हाडाचीं काड करावीं लागतात—” बापूसाहेब त्रासून बोलत होते.

शेवटीं अशा पाषाण हृदयी माणसापाशीं दयेची याचना करून काय उपयोग, असा विचार करून जिवबा घरीं जाण्यास निघाला.

वाट चालताना शेटजीनीं उच्चारलेले मघाचे शब्द त्याच्या मस्तकात सारखे घुमत होते—

" पैसा कमवायला हाडाचीं काडं करावीं लागतात ! "

खरं आहे ! गरीबानीं हाडाचीं काडं करावीं नि ऐतखाऊ श्रीमंताना पैसा मिळवून द्यावा !

* * *

" किसन, किसन, ते बघ बाबा आले. " दुरून हळू हळू येत असलेल्या आपल्या बापाकडे बोट करीत जाईने किसनला सांगितले.

सायंकाळीं घरट्याकडे परतलेल्या आपल्या आईला पाहून चिमणी पाखरें हर्षाने चिवचिवाट करतात तसा त्या दोघानींही नाचून बागडून एकच गिल्ला केला.

" बाबा, मला वाळे आणलेत काहो ? " बाप जवळ येताच त्याच्या कमरेला विळखा घालीत जाईने विचारले.

जिवबा अजूनहि विचारतंद्रीतच होता.

जाईनें बापाच्या चेहऱ्याकडे पाहिले. त्याच्या डोळ्यात डंवरलेले अश्रू पाहून ती दचकली व चटकन् दूर झाली.

# मायेचें माणूस ६

त्या दिवशीं चिरजीवानी—सदानदरावानीं—दुर्गीकडून आलेलं पत्र जानकीकाकूना वाचून दाखविल, तेव्हा मुलगी फार वर्षानीं जवळच्या गावीं राहायला आली म्हणून त्याचं मातृहृदय जितक उचंबळून आलं, तितकच तिला अलीकडे थोडासा हिंवताप येत आहे हे समजताच त्याच आतडं तळमळू लागलं. अन् म्हणूनच त्यानीं सदानदरावाकडून, त्याना ऑफीसला जायची घाई असताहि तें पत्र तीनतीनदा वाचून घेतल. त्याचवेळीं आपला डावा डोळा सकाळपासून उडत आहे याची जाणीव होताच त्याच्या हृदयात विलक्षण कालवाकालव सुरू झाली. दारापुढल्या कपडे वाळत टाकण्याच्या तारेवर बसून डोमकावळा कर्कशपणें ‘ कावकाव ’ करू लागलेला पाहताच त्याचं काळीज चटकन् चरकलं व अगदीं अनपेक्षित रीतीनच त्याना भयंकर अस्वस्थपणा वाटूं लागला.

नित्याप्रमाणें घाईघाईन चार घास पोटात कोंबून सदानंदराव दुर्गीच्या प्रकृतीबद्दल अवाक्षरहि न काढता ऑफीसला निघून गेले. सुधेनहि सासुबाईना लागलीच वाढून काढलं व नंतर आपल जेवण व इतर काम झटपट उरकून ती कालच खरेदी केलेलं, ‘ पोतदार आणि कंपनी ’ चं एक भरत कामाचं नवं आकर्षक डिझाईन टेबल क्लाथवर उतरविण्यात गढून गेली. आज जानकीकाकूना रोजच्यासारखं जेवण गेलं नाहीं, हें तिच्या लक्षांत येऊनहि

कामाच्या गडबडींत त्याबद्दल सासुबाईंना विचारण्याचं भान तिला राहिलं नव्हत.

विपर्यास ! विपर्यास ! ! विपर्यास ! ! !

मुलाच्या व सुनेच्या या वागणूकीचा जानकीकाकूंनी भलताच विपर्यास करून घेतला. सदानंदरावाना आपल्या बहिणीची माया नाहीं, आपली किमत नाहीं या गोष्टीची आज खात्री वाटून त्याना अतिशय मनस्ताप झाला. सूनबाईबद्दल त्याच्या अपेक्षा फार मोठ्या नव्हत्या, पण आज तिच्या वागणूकींत त्याना जी बेपर्वाई व निष्ठुरता दिसून आली त्याचा त्याना मनस्वी संताप आला.

पण उघडपणें त्याबद्दल कांहींच न बोलता त्या एका बाजूस पडून मनातल्या मनात धुसपुसत व कुढत राहिल्या होत्या.

गेली सात आठ वर्षं जानकीकाकूंना दुर्गी दुरावली होती. दिनकररावाना—दुर्गीच्या पतिराजाना—अलाहाबादेस ' धी नॅशनल ट्रेझरी ' नावाच्या एका नवीनच निघालेल्या बॅंकेत नोकरी लागली होती त्यामुळें ते इतके दिवस सहकुटुंब तिकडेच जाऊन राहिले होते. गेल्याच महिन्यात त्याची निमगावच्या शाखेमध्यें बदली होऊन ते फिरून जवळ आले होते.

दुर्गी अलाहाबादेस असताना तिच्याकडून जानकीकाकूंना मधून मधून नेहमीं पत्रं येत असत. घरातील अडचणीमुळें आपल्याला इकडे येता येत नाहीं याबद्दल अतिशय खेद प्रदर्शित करून ती प्रत्येक पत्रातून आपल्या आईला चार दोन महिने तरी अलाहाबादेस आपल्याकडे येऊन राहाण्याविषयी आग्रह करीत असे. पण जानकीकाकूंना तें जमाव कस ? पोफळवाडीपासून अलाहाबादेच अंतर थोडं का आहे ? पोफळवाडी म्युनिसिपालीटीच्या ऑफिसातून सदानंदरावाना मिळणारा ' लठ्ठ ' पगार लक्षात घेता त्याना आपल्या मातुश्रीला अलाहाबादेला नेऊन आणण्याचा

खर्च झेपणं कितपत शक्य होतं तें कुणाच्याहि चटकन् ध्यानात आल असतं.

पण मायेचं अंतराशीं समप्रमाण असतं असं म्हटलं पाहिजे. कारण दुर्गी दूर गेल्यापासून जानकीकाकूची तिच्यावरची माया मनस्वी वाढली होती, व तिच्याकडून येणाऱ्या प्रत्येक पत्राच्या-वेळीं, आपण तिच्याकडे जाऊं शकत नाहीं याबद्दल वाईट वाटून त्याच्या दोन्हीं डोळ्यावाटे 'राजापूरची गगा' दुथडी वाहात असे.

आता सदानंदरावाचा स्वभाव निराळा होता; व तो जानकी-काकूना ' चमत्कारिक स्वभाव ' वाटत असे. त्याच्या मताप्रमाणें सदानदरावाना कुणाचीच फारशी माया नव्हती. दर भाऊबीजेला ते जे ओवाळणी म्हणून दुर्गीला पोष्टानं नवी नवी वस्तू नियमानं धाडीत ते बहिणीबद्दल आपल्याला ' काहीं तरी ' वाटतं म्हणून नव्हे तर केवळ एक कर्तव्य म्हणून अशी त्याची दृढ समजूत होती. त्याचप्रमाणं संसाराच्या वाढत्या व्यापामुळं सदानदरावाना भासणारी खर्चाची ओढाताण जानकीकाकूना दिसत नव्हती असेंहि नाहीं; पण तशातहि त्याना आपल्याला एकवेळ अलाहा-बादेला नेऊन आणता आल असत, असं त्याना वाटत होत.

वेळीं अवेळीं आईचे पाय मळीत बसण्याइतकी सदानंदरावाची मातृभक्ति जशी पराकोटीला पोंचली नव्हती तशी त्याना आपल्या आईबद्दल बिलकूल आस्था नव्हती असेहि नाहीं. आपल्या आईला काय हव काय नको याबद्दल ते योग्य तेवढी काळजी घेत. यापेक्षा जास्त पाहायला त्याना फुरसतच नसे. पण जानकी-काकूंच येवढ्यान समाधान होत नसे; व त्यामुळेच त्याना वाटे, मुलगा आपल्याला विचारीत नाहीं. व अशावेळीं दुर्गीकडे जाऊन चारदोन महिने राहावं असं त्याना खूप खूप वाटे. पण नुसतं वाटून काय उपयोग ?

आपल्या सुनेबरोबर जानकीकाकूंच पूर्वी पूर्वी फार चागल जमत होत, कारण त्यावेळीं कधीं कधीं आपले मत बाजूस ठेवून-सुद्धा सुधा सासुबाईच्या मताला मान देत असे. त्यामुळे मतभेदाचा प्रश्नच उरत नसे. पण अलीकडे ती तीन मुलाची आई झालेली असल्यामुळे तिचा अधिकार वाढला होता, आता तिच्यात आपली मत निर्भिडपणे माडण्याचा पोक्तपणा आला होता. साहजिकच या फरकामुळे एकाद्या क्षुल्लक गोष्टीतहि कधीकधीं सासुसुनेंत फार मोठा वितडवाद माजत असे.

नातवडाबद्दल मात्र जानकीकाकूना वाटणार वात्सल्य समुद्राप्रमाणें विशाल होत, आणि समुद्राप्रमाणेंच त्याला भरती ओहोटीची उपाधि होती. फेरीवाल्याकडून एकादा जिन्नस खरेदी करते वेळीची लहानग्या लीलीची लुडबूड व चिमण्या चदूचे व्यवहारचातुर्य पाहून जानकीकाकूना त्याच कमालीच कौतुक वाटत असे, व त्याच्या भरात त्या त्याचे कितीतरी ‘ पापे ’ घ्यायच्या ! पण एकाद्यावेळीं जानकीकाकूच घरात काहीतरी बिनसलं असावं म्हणजे नातवंडाच्या तसल्याच लीला त्याना अतिशय तापदायक वाटत, व ‘ काय पण कार्टी !—छळायला आलींत नुसती ! ’ असले रागाचे उद्गार त्याच्याच मुखातून निघत असत.

आजहि तसलीच परिस्थिति निर्माण झाली होती. आपल्या मुलाचा, सुनेचा व नातवडाचासुद्धा आज त्याना अतिशय राग आला होता. ती त्याना अगदीं डोळ्यासमोर नकोशी झालीं होती. पण त्याच्यावर रागावून जायच कुठ, असा प्रश्न जेव्हा त्याच्या मनापुढे पुनः पुनः उभा राही तेव्हा त्या अतिशय कष्टी होत. पण दुर्गी अलाहाबादेला नसून सध्या ती निमगावला आली आहे ही गोष्ट लक्षात येताच त्याना फार बर वाटल. व वादळात सापडून

मार्ग चुकल्यामुळे हवालदील झालेल्या खलाशाला योग्य मार्ग सापडल्यावर वाटणारा आनद त्याच्या वार्धक्यान चुरमुडलेल्या चेहऱ्यावर दिसूं लागला.

पडल्या पडल्याच त्या विचार करीत होत्या—

सदूला, त्याच्या बायकोला किवा त्याच्या मुलाना कुणालाच आपली माया नाहीं. फुकट आहेत हीं सगळीं ! पुढ पुढ तर आपल्याला मुळीसुद्धा विचारणार नाहींत ही ! दुर्गी मात्र अशी नाहीं हो ! कधी नाहीं टाकायची ती आपल्याला. अलाहाबादेला होती तेव्हा आपल्याकडे येण्याबद्दल तिन कितीदा लिहिल होत; पण आपल्यालाच जमल नाहीं जायला. आता तरी गेल पाहिजे, अनायस जवळ आलीयू .

बेजार झाली असेल बिचारी त्या मेल्या तापान. आधींच पोर अशक्त ! कुणीतरी मायेच माणूस जवळ पाह्यजेच पेजपाणी घालायला .

शेवटी खूप विचार करून, जानकीकाकूनी शक्य तितक्या लवकर दुर्गीकडे जाऊन चागल चार सहा महिने तिच्या घरीं राह्यच अस मनाशीं निश्चित केल. आता सदानदरावापुढें ही गोष्ट काढण्याचीच खोटी होती.

केव्हापासून जानकीकाकूच डोक दुखत होत, पण विचाराच्या भरात त्याच्या ते लक्षात आल नव्हत. आता मात्र त्याना त्याची जाणीव झाली.

नुकताच शाळेंतून आलेला चदू जवळच आपला चेंडू शोधीत होता.

“ चद्या कपाटातला तो बाम देरे. ” जानकीकाकूनी त्राग्यान त्याला म्हटलं.

चंदू आपल्याच नादात होता.

“ माझ्या मामाच्या घरीं—माझ्या मामाच्या घरीं—माझ्या मामाच्या घरीं, मामीचं बघ राज्य ते—” असं म्हणत म्हणत तो तसाच पळून गेला.

* * *

अखेर जानकीकाकूंच्या मनाप्रमाण सर्व काहीं जुळून आलं. आपल्या आईनं उगीचच महिनेच्या महिनं जावयाच्या घरीं जाऊन राहाव हे जरी सदानदरावाना पसत नसल, तरी आईच्या इच्छेला विरोध करून तिचं मन दुखवायलाहि ते तयार नव्हते. शिवाय जानकीकाकू अगदीं निकरावर आल्या होत्या. दुर्गी तापान आजारी, अन् शिवाय ती फार वर्षांनी जवळच्या गावीं आलेली, तेव्हा तिच्या समाचाराला आपणहि जाणं अवश्य आहे याची त्याना जाणीव होती; पण आणखी एक महिनाभर तरी त्याना त्यासाठीं सवड मिळण्यासारखी नव्हती.

मोहोळकराचा मन्या क्रिकेटच्या पचरगी सामन्यासाठीं निमगावला जायचा होता. अनायास जानकीकाकूना त्याची सोबत मिळून दुर्गीचं राहण्याच ठिकाण शोधून काढायला त्याना फार त्रासहि पडला नाहीं.

एकदोन दिवसातच जानकीकाकू नव्या वातावरणात पूर्णपणें मिसळून गेल्या. दुर्गीला हल्ली ताप येत नव्हता, तरी तिची प्रकृति थोडीशी अशक्त झाली होती. म्हणून गेल्याबरोबर जानकीकाकूनीं आपल्या हातीं चूल घेतली, व दुर्गीच पथ्यपाणीहि त्या कळकळीनं पाहूं लागल्या.

लौकरच, दुर्गीच्या परिस्थितीसबधीं आपण केलेल्या कल्पना वस्तुस्थितीशीं फारशा जुळणाऱ्या नाहीत अस त्याना कळून चुकलं. जावयाची काय प्राप्ति होती हें जरी त्याना नक्की ठाऊक नव्हतं, तरी ती बरीच मोठी असावी अशी त्याची कल्पना होती; अन्

म्हणूनच घरात होणारी खर्चाची ओढाताण जेव्हा त्याच्या ध्यानीं आली तेव्हा त्याना मोठंच कोडं पडलं, व त्याचवेळी त्याना दिनकररावाना घोड्याच्या शर्यतीचा जबरदस्त नाद असल्याच, एकदा सदानंदरावानीं सागितलेलं आठवल.

दुर्गीच्या स्वभावातहि त्याना फार मोठा फरक पडलेला दिसून आला. तिला मुलबाळ काही नाही या गोष्टीपेक्षाहि तिचा इतराशीं —विशेषत: नवऱ्याशी—वागण्यातील तुसडेपणा पाहून त्याना फार वाईट वाटलं. आपल्या शेजारणीशींहि तिच फारस सूत नव्हत.

हळु हळु दहाबारा दिवस निघून गेले. जानकीकाकू घरात राबत असत. दोन्हीं वेळच जेवण, चहापाणी ह्यापासून भाड्या-धुण्यापर्यंत सर्व काम त्याच करीत असत. दुर्गीला विसावा मिळावा म्हणून त्या तिला जरासुद्धा कामाला हात लावायला देत नसत. दुर्गीही नतर तिकडे पाहिना. आता तर तिला साफ बर वाटून तिची प्रकृतिहि चागली सुधारली होती.

याच सुमारास नाताळची सुट्टी असल्यामुळें दुर्गीकडे तिच्या नाशिकच्या दोघी मैत्रिणी चार दिवस राहायला म्हणून आल्या होत्या. त्यामुळे घरातल काम बरच वाढल होत. जानकीकाकूंना ते झेपेना; पण मैत्रिणींबरोबर गप्पा झोडण्यात व सकाळसंध्याकाळ फिरायला जाण्यात वेळ जात असल्यामुळे दुर्गीला त्याना मदत करायला बिलकूल फुरसत मिळत नसे.

* * *

त्या दिवशीं घरातल्या कामाचा त्रास होऊन जानकीकाकूंना चागलाच ताप भरला होता. म्हणून त्या अंथरुणावर पडून होत्या.

त्यामुळें आता दुर्गीची मोठीच गैरसोय झाली. जेवणाचीं व इतर सर्व कामं आज तिच्यावर पडली होतीं, म्हणून ती सारखी धुसपुस व आदळ आपट करीत होती. अन् जेव्हा दुसऱ्या दिवशीं

मैत्रिणींसह प्रभा थिएटरात लागलेला ‘तुळसीदास’ पाह्यला जायचा केलेला बेत रद्द करण्याची पाळी येते कीं काय अस तिला वाटल तेव्हा भलत्या वेळी आजारी पडल्याबद्दल जानकीकाकूचा फार राग आला तिला.

सकाळपासून सध्याकाळपर्यंत जानकीकाकू तापान सारख्या तळमळत असत. त्याना औषध देण, त्याच पेजपाणी पाहाणं हीं काम, नाइलाजान का होईना, आता दुर्गीला करावीं लागत होतीं, त्यामुळे आईचा आजार म्हणजे तिला एक मोठी आपत्तीच वाटू लागली.

दुर्गीला आपली किती माया आहे हे जानकीकाकूनाहि पुरतं कळून आल, व इकडे येण्यात केलेल्या मूर्खपणाचा त्याना अतिशय पश्चात्ताप होऊ लागला. आता बर वाटताच ताबडतोब आपण आपल्या घरी निघून जायच असं त्यानी मनाशीं ठरवून टाकल.

आपल्या आजाराचा दुर्गीला त्रास होतो हे त्याना दिसत होत; पण केवळ त्यामुळेच तिन आपल्याशीं अस तुसडेपणान वागाव याच त्याना फार वाईट वाटल.

तापातच त्या विचार करीत—

दुर्गीची आपल्यावर लहानपणी इतकी माया होती, पण आता तिनं आपल्याशीं अशा रीतीन वागाव हे किती विचित्र ! त्यावेळीं आपलं जरा डोक दुखल कीं दुर्गी कशी घाबरी व्हायची. आपल्याला आराम पडावा म्हणून वेडी पोर देवघरात जाऊन देवाला किती किती नवस करायची. आपल्या चेहऱ्यावर जरा चितेची कृष्ण छटा दिसली तर ती अगदीं गोरीमोरी व्हायची. अन् आज—

एक दिवस सध्याकाळच्या वेळीं आपण माजघरात शेजारच्या नीरेबरोबर बोलत बोलत तादुळ निवडीत बसलों होतो. ओसरीवर

जिन्याखालीं दुर्गी मैत्रिणींबरोबर भातुकलीचा खेळ खेळत होती. अगदीं रंगात आला होता त्याचा खेळ. इतक्यात खेळता खेळता मध्येंच येऊन तिनं आपल्याला कापऱ्या स्वरानं विचारलं,

"आई, आई, डाव्या हातावर पाल पडली तर काय होतं ग ?"

त्या अनपेक्षित प्रश्नान आपण गोंधळून गेलों होतो, इतक्यात मध्येंच नीरेन तिला म्हटल,

"अगबाई ! बाईसाहेब, आपल्या हातावर पडली की काय पाल ?"

दुर्गी अगदीं रडकुंडीस आली होती. तिच्या तोंडून शब्दच निघेना.

नतर आपल्याकडे पाहून डोळे मिचकावीत नीरा तिला म्हणाली,

" आता काय करायच ! आई मरते हो डाव्या हातावर पाल पडली तर."

हे ऐकून दुर्गी कशी रडत होती ! तिची परोपरीनं समजूत करता करता आपल्या नाकीं नऊ आले. आपण तिची थट्टा केली, अस सागून नीरेनहि तिला उगी करण्याचा प्रयत्न केला; पण दुसऱ्या दिवसापर्यंत ती रडतच होती.

असल्या आठवणींनीं दुर्गीच्या स्वभावात झालेला बदल जानकी-काकूंना विशेषच तीव्रतेन जाणवू लागला.

तापाच्या चौथ्या दिवशीं जानकीकाकूचा ताप साफ निघाला होता. दुर्गीनं त्याच्याजवळ येऊन हळूच म्हटल,

"आई, हे बघ, ताप निघालाच आहे आता घरात पाहुणे मंडळी आलेली. . जागा अडचणीची. . . .अन् शिवाय त्या-दिवशीं तुला ताप आल्याचं दादाला कळविलं होत—त्यानंहि तुला ताबडतोब बोलावलय् घरीं. . . .तुला सध्या हवा नाहीं मानवायची, ग, इथली..."

दुर्गीच्या बोलण्यातला हेतू जानकीकाकूच्या ध्यानीं यायला फारसा वेळ लागला नाहीं. आपण दुसऱ्याच दिवशीं सकाळीं घरीं जाणार असल्याच त्यानीं तिला त्याच वेळीं स्पष्ट सागून टाकल.

*  *  *

विजेची गाडी स्टेशनामागून स्टेशन मागं टाकीत झपाट्यानं मार्ग आक्रमीत चालली होती. दर स्टेशनावर अनेक माणसं गाडींत चढत होती, व अनेक माणसं खालीं उतरत होतीं. प्लॅट-फॉर्मवर, वर्तमानपत्र विकणाऱ्या पोराची, उतारूंची, हमालाची तशीच फेरीवाल्याची एकच धावपळ चालली होती. एकाद्या चित्राप्रमाणं स्तब्ध राहून जानकीकाकू हे सर्व पाहात होत्या; पण त्यातील एकहि गोष्ट त्याच्या विचाराची दिशा बदलूं शकत नव्हती. आजूबाजूला इतकीं माणस वावरत असूनसुद्धा त्याना आपण अगदीं एकाकी आहों, अस वाटू लागल होत. आईला ताप आल्याच कळताच, सदानदरावानीं ताबडतोब पत्र पाठवून जानकी-काकूना घरीं परत बोलावल होत हे खर, पण तेवढ्यावरूनच जानकीकाकूच आपल्या मुलाबद्दलच पूर्वीच मत बदललं नव्हत; उलट दुर्गीसबंधीं त्याना आलेल्या नव्या अनुभवावरून ते अधिक ठाम झालं होत. त्यामुळेच आता त्याची स्थिति खेळाडूच्या हातून निसटून आडबाजूस जाऊन पडलेल्या चेडूसारखी झाली होती.

विलक्षण विमनस्क झाल्या होत्या त्या यावेळीं. अनेक तऱ्हेच्या विचाराचा नुसता गोंधळ माजला होता त्याच्या चित्तात.

अशा स्थितींत किती वेळ गेला याची त्याना कल्पनाहि नव्हती. पण पोफळवाडी स्टेशन येताच त्या खडबडून उठल्या; व बाहेर येऊन जड पावलानीं घरचा रस्ता चालूं लागल्या.

जानकीकाकू घरीं पोंचल्या त्यावेळीं सदानदराव घरीं आणलेलं

ऑफीसचं काम पहाण्यात गुंतले होते. आईला पहाताच सस्मित चेहऱ्यान त्यानीं विचारलं,

" आई, कशी आहे तुझी प्रकृति ? टागा तरी करून यायची होतीस घरापर्यंत. "

जानकीकाकू मुकाट्यानंच आत शिरल्या.

टेबलावरचे कागद आवरून सदानंदराव तसेच त्यांच्या बरोबर घरात आले.

सासूबाईना पहाताच सुधेच्याहि चेहऱ्यावर हास्य झळकलं. चुलीवर शिजत घातलेली डाळ खाली उतरून तिन झटकन् एक पेलाभर चहा टाकला.

चंदू व लीला एकदम येऊन " आजी, आजी " करून त्याना केव्हाच बिलगली होतीं. धाकटी मजू आजीला पहाताच आपल्या चिमुकल्या हातानीं टाळ्या वाजवून खिदळूं लागली होती.

जानकीकाकू हें सर्व चकित होऊन पहात होत्या. अगदीं नकळतच त्याचं अंतःकरण वात्सल्यान भरून आल. त्या प्रवाहात चहाताना त्याना बसायचहि भान राहिल नव्हत.

# उलटलेली नाव

## ७

प्रदक्षणा पुऱ्या होताच तुळसीवृंदावनासमोर उभी राहून व हात जोडून सारजा मनातल्यामनात काहींतरी पुटपुटली.

किती तन्मय झाली होती तिची वृत्ति यावेळी ! तुळसी माताहि किती एकाग्रतेने ऐकत होती तिची प्रार्थना !

लहानगा शाहू मात्र बुचकळ्यात पडला होता.

आईची प्रत्येक कृति तो विस्मयाने न्याहाळीत होता.

त्याच्या आईचा तो नित्याचा परिपाठ होता, व तो त्याच्या परिचयाचाहि झाला होता. पण अलीकडे त्याला त्यात मोठा फरक दिसत होत. पूर्वीचा यांत्रिकपणा—कोरडेपणा त्यात हल्लीं नव्हता.

“ आई, बाबा येणार तरी केव्हा ग ? ” आईची पुजा सपलेली पहाताच शाहूचे पुन्हा टुमणें सुरूं झालें.

“येतील ह इतक्यात माझ्या सोन्या. काम पाह्यला गेलेत ना—?” असे म्हणून सारजा त्याला हातीं धरून घरात जाऊ लागली.

आईच्या उत्तरानें शाहूचे बिलकुल समाधान झालें नाहीं. कालपासून शंभरदा त्याने आपल्या आईला तो प्रश्न विचारला असेल; व त्याच्या आईनेहि त्याला तितक्याच वेळा हें एकच उत्तर दिलें होतें.

आता मात्र त्याने भोकाड पसरले.

सारजेला आता त्याला उगी करणें शक्य नव्हतें. म्हणून तिनें आपल्या धाकट्या भावाला हाक मारली.

" राजा, या सोन्याला ने ह तिकडे. आता खाऊ घेऊन येतील जा बाळाला. "

" हं चल शाहू. रस्त्यावर जाऊन आता आपण बाबाची वाट पाहू या." राजाने आपल्या भाच्याला बाहेर नेले.

* * *

'लक्ष्मी नारायणाचा जोडा' म्हणून सारजा आणि सदानद याच्याकडे गावातील सारे लोक बोट दाखवीत असत.

नादी नारायणाच्या सहवासात लक्ष्मीला लाभणाऱ्या सुखाची आपल्या सुखाशीं तुलना करण्याचा विचार सारजेच्या मनाला कधीच शिवला नव्हता. पण ती स्वतः मात्र नेहमीं समाधानात असे, आणि [सुख नेहमीं समाधान वृत्तींतच असते.]

सदानंद हा समजूतदार, निर्व्यसनी, सुदृढ व उमद्या स्वभावाचा तरुण होता.

'लाथ मारू तिथ पाणी काढू' अशी त्याला धमक होती.

आपल्या गावातच राहून शेतीवर उदरनिर्वाह करायला त्याचे महत्त्वाकाक्षी मन तयार नव्हतें.

शहरात जाऊन एकादा स्वतत्र उद्योगधंदा करून नावलौकिक मिळविण्याचीं सुखस्वप्ने त्याला वारवार पडत असत.

लहानपणापासूनच त्याचा मोटारच्या धद्याकडे ओढा होता. मध्यंतरीं त्याने बोरगावला जाऊन आपल्या एका मित्राच्या खटपटीने मोटार हाकण्याचें शिक्षणहि घेतले होते.

आईबाप वारल्यावर तर त्याचें चित्त शेतवाडीवर बिलकुल थरेना.

खेडेगावात राहून मातींत खपून आयुष्य मातीमोल करण्यापेक्षा दूर एकाद्या शहरात जाऊन मोटार कपनीचा मालक बनावे असें त्याच्या मनाने फार फार घेतलें होते.

त्याचा एक मित्र बोरगावला मोटार ड्रायव्हर होता. त्याच्याच

सल्ल्याने त्याने पुढें लवकरच आपलें वडिलोपार्जित शेत विकून एक मोटार खरेदी केली.

यानतर त्याने बोरगावला आपले बिऱ्हाड थाटले. गावाहून येताना त्याने आपल्या पोरक्या मेहुण्यासहि आणले होते.

शहरात आल्यावर तिथल्या नव्या नवलाईने सारजेचे डोळे दिपून गेले. पहिल्याने आपल्या नवऱ्याचा विचार तिला फारसा पसत पडला नव्हता. व सदानदाला प्रत्यक्ष विरोध करण्याचें धैर्य जरी तिच्यात नव्हते, तरी ती त्याला विशेष अनुकूल नव्हती.

पण आता मात्र धद्यातील चलती पाहून आपणच पूर्वी चुकत होतो असे तिचें मन म्हणू लागले.

शहरातील चैनी जीवनापुढे तिला आता आपले पूर्वीचे साधेसुधे जीवन हिणकस वाटू लागले.

अलीकडे नकळतच तिच्या डोळ्यापुढे मोठेपणाचीं मनोहर स्वप्ने तरगू लागली होती.

मात्र सदानदाची याच्या अगदीं उलट स्थिति झाली होती.

पहिल्या पहिल्याने त्याचा धदा चागला चालत होता; हातात चार दिडक्याही येत असत. पण मोटारीच्या कामीं आकस्मिक होणाऱ्या खर्चापुढे त्या टिकत नसत इतकेच !

शिवाय मोठमोठ्या भाडवलवाल्यापुढें सध्याच्या दारुण स्पर्धेच्या काळात टिकून राहाणे अतिशय कठीण होते.

सदानद अगदी वैतागून गेला.

मालक बनण्याची स्वप्ने त्याला आता मृगजळासारखीं वाटूं लागली.

' शेत विकून मोटार घेण्यात आपण फार मूर्खपणा केला हे त्याला आता पटूं लागले होते. पण प्राप्त परिस्थितीशीं तोंड देण्याखेरीज त्याला गत्यतर नव्हते.

सदानदाभंवती आता मित्राची बरीच •मोठी प्रभावळ गोळा झाली होती.

पण त्याच्यामुळे सदानदाचा काडीचाहि फायदा न होता उलट तो अगदी व्यसनी बनला होता.

त्याच्या अंगच्या सद्गुणाची जागा दुर्गुणानी पटकावली होती.

व्यवहाराच्या व्यापामुळें वैतागलेले त्याचें मन दारुच्या पेल्यात आराम शोधू लागले.

ससाराचा ताप विसरण्याच्या मिषाने सदानंद प्रत्यक्ष माणू-सकी विसरला.

त्याचे मित्रहि त्याला या बाबतीत उत्तेजन देत असत त्यामुळें आता सदानदाला बरेच कर्ज झाले होतें.

पैशासाठीं सावकाराचा तगादा सुरू झाला. शेवटीं नाइलाजानें सदानदाने मोटार विकून टाकली, व तो ऋणमुक्त झाला.

कर्ज फेडून थोडेसे पैसे शिल्लक उरले होते, पण ते किती दिवस पुरणार ?

आज दोन महिने तो नोकरी शोधीत आहे. दुसऱ्याच्या मोटा-रवर ड्रॉयव्हर म्हणून राहायला त्याचे मानी मन तयार नव्हते. पण हे कुठवर चालणार ? यापुढे खर्च कशावर चालायचा ?

दोन दिवसापूर्वीच तो नोकरी शोधण्यासाठीं म्हणून बाहेर गेला होता तो अजून परत आला नव्हता. सारजेला किती काळजी लागून राहिली होती !

धाकटी मुलगी मजू गेले तीन दिवस तापाने फणफणून राहिली होती. तिला औषध आणून देण्यासाठीं सारजेपाशीं फुटकी कव-डीही नव्हती. कालपासून तिचा उजवा डोळा सारखा उडत होता. स्त्रीस्वभावानुसार तिच्या भावनाप्रधान मनात भलभलत्या अमंगल कल्पना कल्लोळ करीत होत्या.

अशा अनेक प्रसंगीं आपल्याला जवळपास असा कोणताच मायेचा आसरा नाहीं ही जाणीव सारजेला अतिशय तापदायक होई.

नाहीं म्हणायला मागीलदारचे तुळसीवृंदावन तिला सहानुभूति दाखवायला सदैव तत्पर असे. कितीकदा तरी सारजेने त्याच्यापुढें अश्रुविमोचन करून आपल्या अंतःकरणाचे दुःख हलके केले असेल !

सगळ्या अडचणी दूर व्हाव्या, नवऱ्याला नोकरी मिळावी व सर्व काहीं नीट चालावें म्हणून सारजा आताहि तुळसीमातेला प्रार्थीत होती.

*　　*　　*　　*

शेवटीं एकदा सदानंदाला नोकरी लागली. नवीनच सुरू झालेल्या एका मोटार कंपनींत तीस रुपयावर ड्रायव्हर म्हणून तो राहिला होता.

आता सदानंदाच्या आयुष्याचे नवें पान उलटले होते.

मध्यंतरी दारुच्या व्यसनात सदानंद बराच गुरफटला होता. पण आता यापुढे दारुच्या थेंबालाहि स्पर्श करायचा नाहीं असा त्याने निश्चय केला होता.

आणि त्याप्रमाणे वागून तीस रुपयाच्या अल्प प्राप्तींतहि सारजेच्या टापटिपीच्या वागण्यानें त्याला आपला संसार सुखानें चालविता आला असता.

पण—

दैवाची इच्छाच काही निराळी होती.

मदिरेचा मोह आवरणे सदानंदाच्या आटोक्याबाहेरचे होतें.

सायंकाळीं थकल्या भागल्या जीवाचा शीण घालविण्यासाठीं अगदीं नकळतच त्याचे पाय दारूच्या गुत्त्याकडे नेत.

समोर आलेल्या दारूच्या पेल्यापुढें क्षणभर त्याला केलेल्या निश्चयाची विस्मृति पडे.

आणि बाहेर आल्यावर मग जेव्हा त्याच्या अंतःचक्षूंसमोर सारजेची करुण मूर्ती व आपल्या निरपराध मुलाचे चिमणे चेहरे उभे राहात तेव्हा त्याला आपल्या कृत्याची लाज वाटून अतिशय पश्चात्ताप होई.

पण पुढें पुढें त्याचे मन पक्के कोडगे बनलें. आता तो बिन दिक्कत दारू पिऊं लागला होता.

तो आताशा घरी सुद्धा खुशाल झिंगून येई व हवा तसा धागड-धिंगा करी. त्यावेळीं सारजेला किती दुःख होई त्याची त्याला बिलकूल पर्वा वाटत नसे.

या बाबतींत त्याच्या मालकानेंहि त्याला चांगलें खडसून काढले. ‘ अशा छाकटपणानं वागायचं असलं तर कामावरून काढून टाकू ’ असे त्यानें त्याला एक दिवस स्पष्ट सांगितलें.

* * *

अलीकडे सदानंदाच्या बेताल वागण्याचा कळसच झाला होता.

कधीं कधीं तो दोन दोन दिवसात घराकडे फिरकत सुद्धा नसे.

सारजा तर काय बोलून चालून अबलाच !

स्वतःबद्दल तिला कांहींच वाटत नसे, पण आपल्या अजाण मुलाची उपासमार पाहून तिचें आतडे तटातट तुटे. आपल्याच जीवाचे कांहीं तरी बरें वाईट करून घेऊन या त्रासातून कायमचें मुक्त व्हावें असें तिला अनेकदा वाटत असे. पण आपल्या निरपराध मुलाकडे व निराधार भावाकडे पाहून असला अविचार करायला तिचें मन कचरत असे.

आज दोन दिवस सदानंदाचा कुठे पत्ता नव्हता.

घरात एक दाणासुद्धा नव्हता.

थंडावलेल्या चुलखंडापुढें पडलेलें शाहूचे आवडतें मांजर आळसटपणानें आळोखे पिळोखे देत होतें.

सदानदाचा इमानी कुत्रा मोत्या, भुकेनें व्याकुळ होऊन, अन्नासाठीं आपल्या धणीनीकडे शेपटी हालवीत आशाळभूतपणानें पाहात होता.

शाहू आणि मंजू तर एकसारखी 'भूक भूक' करून रडत होतीं.

अशावेळीं सारजा तरी त्याची कशी समजूत घालणार ?

शेवटीं शेजारच्या वाण्याच्या दुकानातून थोडे तादूळ उधार आणण्यासाठीं सारजेनें राजाबरोबर शाहूला पाठविलें.

'माल चोख पैसा रोख' असे त्या वाण्याचे तत्त्व होतें, शिवाय तो सदानदाला पूर्ण ओळखीत होता. मग शाहूच्या केविलवाण्या शब्दानी त्याला कसा पाझर फुटायचा ?

त्या अजाण बालकावर एकदम खेसकून तो म्हणाला,

"चल नीघ. आधीं पैसे आण मग तादूळ."

"पैसे ? पैसे बाबा देतील घरीं आल्यावर—" शाहू दीनपणाने म्हणाला.

"ह्यं ह्यं ह्यं ! तुझा बाप पैसे देणार ? तो तर मोटारसकट तिकडे गटारात झिगून पडलाय्—" वाणी उपहासाने हंसून म्हणाला.

"काय ? मोटारसकट गटारात— " राजा एकदम दचकून म्हणाला. तो आता अगदीं हतबुद्ध झाला होता.

* * *

अखेर व्हायचे तें झालेंच ! दारूच्या धुंदींत मोटार हाकताना सदानंदाच्या हातून भयंकर मोठा अपघात झाला होता. रस्त्यावरील वळणावर एका मोठ्या झाडाशीं त्याची मोटार आदळली होती.

सदानंदाच्या छातीला जबरदस्त दुखापत झाली होती.

भावाकडून अपघाताची गोष्ट कळताच सारजा हंबरडा फोडीत सदानंदाला भेटण्यासाठीं निघाली.

येवढ्या वेळात सदानंदाला दवाखान्यात नेलें होते.

सारजेला व मुलाना पहाताच, दारूच्या नादाने आपण संसाराची कशी धुळधाण केली याची कल्पना येऊन सदानंदाच्या डोळ्यावाटें अश्रूचा पूर वाहूं लागला.

" सारजा—कशाला आलीस या नीचाला भेटायला...? जा जा. असाच व्हायचा शेवट आम्हा दारुड्याचा.. ! " सदानंदाला अतिशय पश्चात्ताप झाला होता.

" हाय ! हाय ! काय केलंत हे ! दारूपायीं सोन्यासारख्या संसाराची माती झाली, अन् शेवटीं—"

सारजा धाय मोकलून रडत होती.

* * *

दुसऱ्याच दिवशीं सदानंदाने परलोकीं प्रयाण केलें.

भर समुद्रात नाव उलटल्यावर आतल्या उतारूची जशी वाताहात होते तशी आता त्याच्या कुटुंबाची स्थिति झाली होती.

कुठे कुणास ठाऊक, सारजा भ्रमिष्ट होऊन, दूर कुठे तरी निघून गेली होती.

राजा कुठल्या तरी एका चहाच्या दुकानात कपबशा विसळूं लागला होता.

शाहू नि मजू—अशीच पृथ्वीच्या पाठीवर कुठे तरी राहिली होतीं बिचारीं !

तोंडानें ' कूऽऽ कूंऽऽ कूऽऽ ' असा आवाज करीत मोत्या घराभोंवतीं सैरावैरा धावत होता.

दारापुढल्या शेवग्याच्या झाडाखाली शाहूचे आवडते माजर उदासवाणे होऊन बसलेलें दिसत होते.

आणि हें सारें पाहूनच कीं काय, मागील दारची तुळस दुःखातिशयानें सुकून मान टाकून पडली होती.

# पीरडोंगरी

८

' येत्या रविवारीं पीरडोंगरीवर जायचं ' अस आईन म्हणताच्च काय आनद झाला उल्हासला ! सात आठ वर्षांचा लहानगा उल्हास—त्याच चिमुकल हृदय या आनदाच्या भरात सारख थयथय नाचू लागल. त्याला ही आनदाची वार्ता कुणाला सागू आणि कुणाला नको अस होऊन गेल.

इतक्यात शेजारच्या कलाकाकू पाण्याकरिता विहिरीवर आलेल्या त्याला दिसल्या. उल्हास जाऊन ठेपलाच त्याच्याजवळ.

" कलाकाकू, कलाकाकू, आमी किनई रविवारीं पीरडोंगरी पाह्यला जाणार—गलबतातन " त्यान उतावळीन त्याना सागितल.

उल्हास शेजाऱ्यापाजाऱ्याना—सर्वांनाच आवडे. त्यातल्या त्यात कलाकाकूना तर तो आपल्या मधूप्रमाणेंच जीव कीं प्राण वाटत असे. त्या नेहमी कौतुक करायच्या त्याचं.

" खरंच जाणार ?—पाढऱ्या रविवारीं का ? " त्यानी पाण्याची घागर कडेवर चढवीत मुद्दामच जरा मिष्किलपणान हसत हसत विचारल त्याला.

कलाकाकूच्या प्रश्नान थोडासा विरस झाला त्याचा.

" बघा जाऊ कीं नाहीं ते " यापेक्षा अधिक काहींच बोलू शकला नाहीं तो त्यावेळीं.

तितक्यात त्याला काय वाटल कुणास ठाऊक ! तो तिथनं तडक

स्वयंपाक घरात गेला नि जरा हलक्याच आवाजात आपल्या आईला म्हणाला,

" आई, पण नक्की जायच ना ? नाहीतर निघायच तुझ दुसरंच काहीं तरी काम. "

उल्हासला नेहमींच्या अनुभवामुळें हा बेत ऐनवेळीं फिसकटेल कीं काय अशी थोडी भीति वाटली असावी.

" काय कटकट चालविलीयस् रे ! चालता हो पाहूं इथन— "

शाताबाई स्वयंपाकाच्या गडबडींत होत्या. तशात कादा कीं कायस चिरताना नुकताच त्याचा हात कापला होता. त्यामुळें त्याना उल्हासची पीरपीर सहन न झाल्यास आश्चर्य नाहीं.

आईन दिलेल्या तबीन उल्हासचा अर्धाअधिक आनद मावळून गेला. इवलस तोंड करून तो तिथन निघून गेला.

* * *

दुसऱ्या दिवशीं शनिवार होता म्हणून उल्हास सकाळींच शाळेंत गेला होता. भूगोलाच्या तासाला सामत मास्तरानी मुलाना त्याच्या तालुक्याचा नकाशा समजावून दिला. त्या वेळीं उल्हासला नकाशात पीरडोंगरी पहायला मिळाली.

पीरडोंगरी !

" मास्तर तुम्हीं पाहिलीय् कीं नाहीं पीरडोंगरी ? " त्यानं मास्तराना कुतूहलान विचारल.

मास्तरानीं फक्त जीवदानीची डोंगरी पाहिली होती.

" उः " ते जराशा बेफिकीरीनं म्हणाले, " काय पाह्यचय् त्यात ?—एक समुद्रातला साधारण मोठासा खडक आहे तो !

उल्हासला पीरडोंगरीची सारखी ओढणी लागली होती. मास्तराच्या उत्तराला त्यान काहीं फारस महत्त्व दिलं नाहीं.

गलबतातन नुसत फिरायला मिळाल तरी पुरे आहे. नसेना का पीरडोंगरी पहाण्यासारखी. त्यान आपल्या मनाची समजूत केली.

शाळा सुटल्यावर उल्हास घरीं आला.

" उल्हास, जरा येवढी कोथबीर काकूना नेऊन देरे." आईन त्याला म्हटल.

रोजच्या सारख ' मी नाहीं जा ' अस सत्याग्रही उत्तर न देता पटकन् आईच ऐकल त्यान.

शाताबाईना थोडंस हसूच आल.

आज तो आईचा प्रत्येक शब्द तत्परतेनं झेलीत होता. हो ! त्याला पीरडोंगरीवर जायच होत.

*　　　*　　　*

रविवार उजाडला. रोज सकाळीं सहल करण्याकरिता उल्हासचा भाऊ समुद्र किनाऱ्यावर जात असे. कालच त्याच्याकडे पालघरचे कोणी पाहुणे आले होते. तेहि आज त्याच्याबरोबर फिरायला निघाले होते.

" भाई, गलबतवाल्याला सागितलय् ना ?" उल्हासनं भावाला मोठ्या उत्सुकतेनं विचारलं.

" अरे हो ! माझ्या लक्षातच राहिलं नाहीं तें. आज आपल्याला पीरडोंगरीवर जायचंय् नाहीं का ? "

भावाच्या विसराळूपणाचा असा राग आला उल्हासला !

" आत्ताच जाऊन ठरवितों, बघ गलबत." त्याच्या भाईनं आश्वासन दिलं.

" मी येऊं का तुमच्याबरोबर फिरायला ? " त्यानं म्हटल, " आज आपल्याला सुटी आहे—शाळेत कुठ जायचंय् ?"

कदाचित् फिरूनहि भाईला विसर पडायची अशी उल्हासला भीति वाटत होती. अन् म्हणूनच तो त्याच्याबरोबर जायला पहात होता.

त्याच्या भाईनहि जास्त आढवेढे न घेता कबूल केलं ते.

उल्हास फिरायला जाण्यास निघालेला पहाताच शरद्, विमल कलाकाकूंचा मधू—सर्वच मुलं निघाली त्याच्याबरोबर.

पाहुणे बरोबर नसते तर त्याच्या भाईन त्या सर्वांना चागलाच खाऊ दिला असता.

*            *            *

सकाळची शात वेळ असली तरी नुकतच थोडसं वादळ उठलेलं असल्यामुळे समुद्राच रूप खवळल्यासारख दिसत होत.

पाण्याच्या पृष्ठ भागावर उच उच उभारणाऱ्या खेळकर लाटा एकमेकीचा पाठलाग करता करता किनाऱ्यापर्यंत पोंचेतों कोठच्या कोठेच विरून जात होत्या.

अचपल वायुलहरी मधून मधून किनाऱ्यावरील काळसर वाळू अस्मानात उधळून मिस्किलपणान हसत हसत पुढे निघून जात होत्या.

लाटाबरोबर किनाऱ्यापर्यंत आलेला पाढुरका फेस थोडासा वेळ जागेवर स्थिर होतो न होतो तोंच जमिनीतच विरून जाई.

किनाऱ्यावर पोंचताच सारी मुलं भिरभिरणाऱ्या आनदाच्या भरात मनसोक्त नाचूंबागडू लागलीं.

जणू काय सारी मौज आजच लुटून फस्त करता यायची नाहीं म्हणून उल्हासन, अंगातल्या कोटाची घडी वाळूवर टाकीत असलेल्या भाईला म्हटलं,

" भाई, आमी उद्यापण येणार ह. "

" रोज यायचं. किती मौज वाटते नाही इथ ? " बाकीच्या मुलानींहि त्याची री ओढली.

" अच्छा. पण—" इतके शब्द उच्चारून झाले नाहींत तोंच त्याच्या भाईनं पाहुण्यासह धावण्यास आरभ केला.

मुलेहि कागदाच्या चिमुकल्या होड्या करून त्या पाण्यात सोडण्यास गेली.

कलाकाकूंचा मधू जरा भित्रा होता.

“ आपण नाहीं बुवा पाण्यात येणार. ” तो म्हणाला.

“ हत्. भागूबाई रे भागूबाई ! ” अशी त्याची हुर्यो करीत सारीं मुल एकमेकाच्या अंगावर पाणी उडवू लागली.

कठोर काळाच्या पोटात काय काळंबेर असत ते कुणाला आधीं कळत का ?

क्षणापूर्वी बागडणारे चेहरे एकदम कोमेजून गेले.

“ भाई, भाई ” अशी साऱ्यानीं ओरड केली.

होडीचा पाठलाग करीत असता उल्हास नकळत काठापासून बराच दूर गेला होता. त्या ठिकाणीं पाणीहि काहीं फारस नव्हत—कमरेच्या खालीच होत त्याच्या.

पण एकदम आलेल्या एका काळलाटेच्या तडाक्यासरशी तो खालीं पडला. आणि दुसऱ्या क्षणीं समुद्राच्या पोटात गडप झाला.

भाई व पाहुणे दोघेहि लागलीच पाण्यात शिरले. त्यानीं प्रयत्नाची शिकस्त केली पण व्यर्थ ! उल्हास त्याच्या हातीं आला नाहीं.

* * *

“ उल्हास आपण पीरडोंगरीवर जायच हं—जरा भाईला बोलव पाहूं—उल्हास, जरा तो शिक्यातलो पेला दे रे, शहाणा आहे आमचा उल्हास—काय शाळेत जायला उशीर होईल ? कलाकाकू, बघा शाळेची किती गोडी आहे त्याला—माझा उल्हास खूप खूप शिकणार—चागला वकील होणार—” शाताबाई बेशुद्धींत बोलत होत्या.

मधून मधून त्या शुद्धीवर येत तेव्हा विचारीत,

“ उल्हास आला ?—कुठं आहे उल्हास ? ”

आजूबाजूला चितातूर होऊन बसलेलीं माणसं एकमेकांच्या चेहऱ्याकडे टकमक बघत.

डॉक्टरानीं शाताबाईना शुद्धीवर आणण्याचे उपचार सारखे चालू ठेविले होते.

आलेली शुद्धी फार वेळ टिकत नसे. मानसिक धक्का जबरदस्त बसला होता त्याना.

किनाऱ्यावर जिकडे तिकडे गलबत फिरत होतीं; पण त्याना उल्हासचा पत्ता लागेना.

सबंध दिवस असाच निघून गेला. रात्रीं आठ साडेआठ झाले असतील. एका खलाशान अभ्रटलेल्या चेहऱ्यानं घरीं येऊन पीरडोंगरीच्या खडकावर उल्हासच छिन्नविछिन्न झालेल प्रेत सापडल असल्याच कळविल.

उल्हासच्या वडिलानीं एक सुस्कारा सोडून कपाळाला हात लावला. साऱ्या घरावर दुःखाचा डोंगर कोसळला.

शून्य दिसती दशदिशा मजला। पाहुं कोठें रे पाडसा ! तुजला ॥
हासऱ्या सगीतवेला निमाल्या । माझा मंजू वीणा भंगला चिमकुला ॥
ठेविसी पाठीमागे पित्याला । दैवा ! का तिलाजली द्यावया सुताला ॥

जवळच असलेल्या सिनेमागृहात चाललेल्या ‘ मायामच्छिद्र ’ खेळामधील हृदय पिळवटून टाकणारे मच्छिद्रनाथाचे विलापस्वर याचवेळीं ऐकूं येत होते.

# पाहिला पगार

## ९

ढेपूळवाडीला जायची संधि कशी चालून आली होती !

गोपाळ शेटजीचा गावात एक धर्मार्थ हॉस्पिटल बाधण्याचा विचार झाला होता. इमारतीचा प्लॅन माझ्याकडूनच काढून घ्यायचा त्याचा आग्रह होता.

गावच्या बाळमित्राचा मुलगा इंजिनियर झालेला ! तेव्हा शेटजींचा आग्रह काहीं गैर नव्हता. पण त्याच्या बोलावण्यानें माझी स्थिति मात्र चमत्कारिक झाली.

ढेपूळवाडी सोडल्याला निदान नऊ दहा वर्षे तरी झाली असतील मला. पण इतक्या वर्षात माझी तिकडे एकसुद्धा फेरी होऊ नये ही केवढी आश्चर्याची गोष्ट !

कवींचा आयुष्यातील अत्यत आवडता काळ जें बाळपण ते माझ सार ढेपूळवाडींतच गेल होत. त्या वेळची एक एक आठवण डोळ्यासमोर उभी राहिली की अजूनहि मन कस मोहोरून जात.

ते गावातल सितळा देवीच देऊळ नि चैत्रात त्याच्यापुढं भरणारी ती लहानशीच जत्रा, ते मोडकळीस आलेल ' श्री लक्ष्मी नारायण ' नाटकगृह, ती गोपाळ शेटजींची ' धान्य दळण्याची गिरण ' नि तो पिठाच्या चक्कीजवळ बसणारा शेटजींचा बटबटीत डोळ्याचा मराठा नोकर. .

सितळा देवीच्या जत्रेच्या आठवणी बरोबर ठळकपणें जी मूर्ति डोळ्यासमोर उभी राहाते ती मुक्ता मावशींची !

एक गरीब विधवा या नात्यानं मुक्तामावशींचा समाजाशीं सबंध यायचा तो मागील दारानच. दळण काडण, भाडी धुणीं, सुईणकाम वगैरे चार धदे त्या ज्या करीत ते केवळ आपल्या वीतभर पोटाची भरती करण्यासाठीं नव्हे !—

मोहन नावाचा एक माझ्याच वयाचा मुलगा होता त्याना. त्याच्या भंवतींच मुक्तामावशींचा सगळा जीव गुतून राहिला होता.

" मोहनच शिक्षण होऊन त्याला एकदा कुठतरी नोकरी लागली कीं झाल. आपलं काय व्हायच राह्यलय् आता—" असे उद्गार त्या नेहमीं काढायच्या.

कामाकाजाच्या निमित्तान व शेजारींच राहात असल्यामुळं त्याच आमच्याकडे नेहमीं येण जाण असायच. त्याच्या मनमिळाऊ स्वभावामुळ त्या आम्हा सर्वांनाच अगदीं हव्याहव्याशा वाटत. त्याचा मोहन नेहमीं माझ्याबरोबरच असायचा. आमची अगदी गट्टी जमून राहिली होती.

आमच्या आईला तर तो अतिशय आवडे. आम्हा मुलाना दुपारच्या सुट्टींत गुळपापडीचे तुकडे देताना किंवा दर शुक्रवारीं चणे वाटताना ती मोहनला चुकूनसुद्धा वगळीत नसे. सणावाराला किंवा विशेष प्रसगीं घरात काहीं गोडधोड केल असलं तर आई मुद्दाम मोहनला जेवायलाच बोलवायची.

आपल्या मुलाबद्दलच अगत्य व त्याच्यावरील लोभ पाहून मुक्तामावशींना आमच्याविषयीं विशेष ओढा वाटे. अडीअडचणीच्या वेळी किंवा कोणी पाहुणेमडळी आल्यामुळं घरातल काम वाढल असता त्या आमच्या आईच्या मदतीला आपण होऊन धावून येत.

आम्हा मुलाचाहि त्याच्यावर विलक्षण लोभ जडला होता.

सितळादेवीच्या जत्रेला, रामजन्मोत्सवाला किंवा असच कुठं

जायचं असलं तर बरोबर मुक्तामावशी असल्याशिवाय आम्हाला चैनच पडत नसे.

एकदा जत्रेच्या दिवशींच मुक्तामावशीच डोक अतिशय दुखत होतं. म्हणून त्या घरींच स्वस्थ पडून राहिल्या होत्या. पण आम्हाला कुठल चैन पडायला ! त्याच्याकडे जाऊन आम्ही आमच्या बरोबर जत्रेला येण्यासाठीं सारख टुमण लावल त्याच्यामाग. मोहन दूरच उभा होता, कारण तो त्याना अतिशय भीत असे. मी मात्र हाका मारून मारून अगदी नकोस करून सोडलं होत त्याना. पण त्या जरासुद्धा न रागावता हंसत हसत म्हणाल्या,

" आता लहान आहेस्तवर ' मुक्तामावशी, मुक्तामावशी ' करतोयस्. पण मग खूप शिकून मोठा कामदार होऊन दूर गेल्यावर विचारशील तरी कारे तिला ? "

" तुम्हीच पाहाल काय करीन ते. बरोबरच नेईन तुम्हाला कुठहि गेलों तरी. तुम्ही आमच्या मावशी ना ?.. . पण आधीं चला पाहूं आमच्याबरोबर जत्रेला."

" अस काय वेड्यासारख करतोयस वसत ? खरच माझ डोक अगदीं ठणकतयरे. अन् मीच कशाला बरोबर हवीय— तुम्हीच जाना."

" ते काहीं नाहीं तुम्हींच यायला हव—"

इतक्यात आमच्या आईचीच स्वारी तिथ येऊन थडकली; अन् दरडावणीच्या स्वरात म्हणाली,

" थाबा हं ही मीच आलें. त्रास किती द्यायचा माणसाला ! चालते व्हा पाहू आधीं इथन. पडू द्या त्याना जरा—"

आईच्या रागाला आम्ही सारींच भीत होतों. त्यामुळें निरुपाय होऊन निमूटपणें स्वस्थ राहाण्याखेरीज काहीं करता येण्यासारख नव्हतं आम्हाला.

पण आमचीं हिरमुसलेलीं तोंड पाहून मुक्तामावशींना फार वाईट वाटलेल दिसल.

"तस काहीं फार दुखत नव्हतं माझं डोकं. उगीच आडवी झालें होते आपली. येवढीं मुल मागं लागलींत—कशाला रजिस करायच त्याना?" असं म्हणत त्यानी उठून आमच्याबरोबर निघण्याची तयारी केली.

त्यावर मीं म्हटलंच,

"पाहिलंत मुक्तामावशी, तुम्ही निघायचं ठरविल्याबरोबर देवीच्या कृपेनं तुमच डोकं दुखायच थाबलच किनई?"

त्यावर मुक्तामावशी नुसत्या हसल्या; व पाण्यावाचून कोमेजून गेलेलीं झाडझुडप पावसाच्या एकाच सरीबरोबर टवटवीत होऊन हंसूं लागतात तसे आमचे सर्वांचे चेहरे ताबडतोब खुलले.

मात्र चालण्याच्या श्रमान त्या रात्रीं मुक्तामावशीना सपाटून ताप भरला तेव्हा भलता हट्ट धरल्याबद्दल आमचा आम्हालाच फार राग आला.

दिवसामागून दिवस मजेन जात होते. पण पुढे सपाट मैदानातला रस्ता सपून जंगलातला खाचखळग्याचा नि काट्याकुट्याचा रस्ता सुरू झाला.

माझी मॅट्रिकची परीक्षा पास झाली नाहीं तोंच वडिलाना एका कॉन्ट्रॅक्टमध्यें जबरदस्त तोटा लागल्यामुळे आमच राहात घर विकून आम्हाला ढेपूळवाडी सोडावी लागली. या विचित्र घटनेमुळंच कीं काय, ढेपूळवाडीबद्दल विलक्षण ओढ वाटत असूनसुद्धा एकवार तिकडे जाऊन येण्याचा विचार मनात टिकून राहात नसे.

ढेपूळवाडीच्या हायस्कूलात शिकत असता मोहनबरोबर ठरविलेले कित्येक बेत कसे ढासळत गेले त्याची आठवण होताच मन

अगदी विषण्ण होत. वेलावर आलेल्या सगळ्याच फुलातून फळं निर्माण होतात अस कुठ आहे ? त्यातलीं बरीचशीं गळूनच पडतात.

मी डॉक्टर व्हायच नि मोहनन शिक्षण शास्त्रातील तज्ज्ञ होऊन आपल्या मगदुराप्रमाण, ढेपूळवाडी हेच मुख्य केद्र करून समाज-सेवेच क्षेत्र आसपास पसरायच ही मनोहर आकाक्षा किती दिवसापासून आम्ही उराशी बाळगून धरली होती. कितीदा तरी आमचं याविषयी बोलण झाल असेल.

पण—

जीवन कलहात झगडणाऱ्या व्यक्तिमात्राची स्थिति वावटळींत सापडलेल्या पाल्यापाचोळयासारखी असते अगदीं ! परिस्थितीच्या वावटळीत कोण कुठ वाहून जाईल नि कोण कुठल्या सादी कोपऱ्यात अडकून बसेल ते सागता नाहीं यायच कुणाला !

ढेपूळवाडी सोडताना मनाशी धरलेले कित्येक विचारहि सोडावे लागले. श्रीधरपत—वडिलाचे एक सधन स्नेही कॉलेजच्या शिक्षणासाठी मदत देण्याच मनावर न घेते तर माझ शिक्षणहि इथंच थाबवाव लागल असत. श्रीधरपत हे एक बडे कॉन्ट्रॅक्टर होते. आपल्या विशिष्ट व्यवसायामुळच कीं काय, त्याचा विचार मी डॉक्टर वगैरे होण्याच्या भानगडीस न पडता इजिनिअर व्हाव असा होता. श्रीधरपतानीं देऊ केलेली मदत लक्षात घेऊन मला त्याच्या शब्दाला मान देण भाग पडल, व अशा रीतीन डॉक्टर होण्याचा विचार मला अजिबात सोडून द्यावा लागला.

इंजिनियरींगची परीक्षा पास झाल्यावर सध्याच्या भयकर बेकारीच्या काळातहि मला फार दिवस रिकामं राहाव लागल नाहीं. श्रीधरपतानीं खटपट करून लवकरच मला ‘ धी कॉंक्रीट कन्स्ट्रक्शन’ नावाच्या एका कंपनीमध्यें असिस्टंट इजिनियर म्हणून लावून टाकलं.

लवकरच मी माझ्या व्यवसायात गर्क होऊन गेलों. मधून मधून मुक्तामावशी नि मोहन याच्याविषयीच्या कित्येक आठवणी मनात रुंजी घालीत असत, पण त्याच्यात जास्त वेळ घालायला फुरसत कुठली !

मोहन नि मुक्तामावशी अजून ढेपूळवाडीतच असतील का ? मोहनला नोकरी लागून आता तो आपल्याच प्रमाण कुठंतरी दूर निघून गेला असेल सुद्धा. मुक्तामावशीच्या बिचाऱ्याच्या मागले काबाडकष्ट सुटले असतील आता.

एक ना दोन, अनेक तर्क मी करीत होतों. पण त्याच्याविषयीं खरी अशी काहीच हकिगत समजली नव्हती मला.

प्रत्यक्ष ढेपूळवाडीला जाऊन खरी हकिगत समजून घ्यावी, शक्य असल्यास त्याची भेट घ्यावी यासाठी मी अतिशय उत्सुक झालों होतो.

पण आज चागली सधि आली असताना—का कुणास ठाऊक—ढेपूळवाडीला जायला माझ मन अळटळ करूं लागल.

पण कोणतहि कारण पुढ करून गोपाळशेटजींना नकार देण मला शक्य नव्हतं. म्हणून दुसऱ्याच दिवशी पत्र टाकून शेटजींस ‘ पुढल्या आठवड्यात तिकडे येतों ’ अस कळविल. व कपनीकडून रीतसर परवानगी घेऊन मी ताबडतोब ढेपूळवाडीस जाण्याची तयारी केली.

* * *

गाडीत चागली सोयीची जागा मिळाली असूनसुद्धा डोक्यात माजलेल्या विचाराच्या गोंधळामुळ माझ्या एरवींच्या आनदी चेहऱ्यावर आज एक प्रकारची विलक्षण तिरसटपणाची छटा मारीत होती.

गाडींत चढताना स्टेशनवर घेतलेला ताजा ‘सत्यशोधक’

तसाच हाताशीं धरलेला होता, पण त्यातली एक ओळसुद्धा वाचायला लक्ष लागत नव्हत.

माझ्या समोरच एक साधारण मध्यम वयाचा पोक्त गृहस्थ बसला होता. येवढा वेळपर्यंत माझ त्याच्याकडे लक्ष नव्हत, पण आता जेव्हा मी त्याच्याकडे पाह्यल तेव्हा मला मनातल्या मनात खूप हसू लोटल. स्वारीची सारखी चुळबूळ चालली होती. माझ्याजवळ पडलेला ' सत्यशोधक ' त्याला हवा होता अस दिसल. पण माझी चर्या पाहून कीं काय, त्याला तो मागण्याच धैर्य होत नव्हतं. आळीपाळीन एकवार अंकाकडे व एकवार माझ्याकडे तो अशा बुजटपणानं पहात होता कीं शेवटी कंटाळून मींच त्याला म्हटल,

" अंक हवाय ? घ्या कीं मग. "

मोठ्या हर्षानच त्यान मीं पुढ केलेला अंक घेऊन त्याचीं पानं चाळण्यास सुरवात केली.

मींहि नवीनच निघालेल्या एका इंग्रजी मासिकाचा बॅगमध्यें ठेवलेला अंक बाहेर काढून तो उगीचच चाळू लागलों. पण लवकरच मला त्याचा कटाळा आल्यामुळ, अंक तसाच ठेवून दिला, व खिशातून एक गोल्डफ्लेक काढून शिलगावली. वर सोडलेला धुराचा प्रचड लोट खिडकींतून येणाऱ्या वाऱ्याच्या झोताशीं झुंजता झुंजता विरून जात होता. वरकरणी मी शातपणान त्याच्याकडे पाहात होतों, पण मनात मात्र विचाराच नुसत थैमान चाललं होत. ते विचार मी मुख्यतः गोपाळशेटजींच्या ज्या कामासाठीं ढेपूळवाडीस जात होतों त्यासबधीं नसून मुक्तामावशी नि मोहन याच्यासंबंधींच होते.

उद्या कदाचित् मुक्तामावशी आपल्याला भेटतील त्यावेळीं आपल्याला पाहून त्याना काय वाटेल ? लहानपणीं आपला

त्याच्यावर केवढा लोभ होता, पण इतक्या वर्षात आपण त्याची एका पत्रानसुद्धा विचारपूस केली नाहीं...

मोहनची नि आपली केवढी मैत्री होती ! पण हीं का मित्रत्वाचीं लक्षणं ? इतक्या वर्षात त्याच्या अस्तित्वाची सुद्धा आपणाला जाणीव राहू नये ?. .

माझी विचाराची साखळी आणखीहि खूप लाबत गेली असती, पण मध्येंच तो समोरचा गृहस्थ 'सत्यशोधक' वाचता वाचता ओरडला,

" आत्महत्त्या ! "

मी त्याच्या 'आत्महत्त्ये'चं कारण कळून घ्यायासाठीं प्रश्नार्थक मुद्रेनं समोर पाहूं लागलो.

" हे वाचलत का "

मीं गंभीरपणान विचारल,

" काय ? "

त्यानं आपल्या हातातील अंक माझ्यापुढ धरून त्यात ठळक अक्षरात छापलेली एक बातमी मला दाखविली—

**एका सुशिक्षित तरुणाची आत्महत्त्या** !

" बेकारी बरं ही बेकारी ! " तो आवेशान म्हणाला.

" चाललय ! " मीं शातपणानं म्हटलं.

गृहस्थ आणखी खूप बोलत होता. 'बेकारी व तिचं निवारण' या विषयावर त्यानं मला एक मोठं व्याख्यान ऐकवलं.

त्याच्या बोलण्यातील कळवळा नि आवेश पाहून मला खूप गंमत वाटली. खिशातून एक गोल्डफ्लेक काढून मीं ती त्याच्यापुढं केली.

" अंहं. मी नाही ओढीत कधीं तसलं कांहीं. "

" अस्सं ! मीं हंसत म्हटलं.

थोडया वेळानं ' सत्यशोधक 'चा अंक माझ्याकडे परत देत त्यानं विचारलं.

" आपल्याला कुठ उतरायचंय्, म्हटलंत ? "

" ढेपूळवाडीला. "

" काय ढेपूळवाडीलाच ? "

" का ? "

" नाहीं,—म्हटल, मलाहि तिथच उतराचंय्. "

" छान ! "

" मी तिथलाच राहणारा. स्टेशनजवळ कोळशाची वखार आहे माझी. "

" अस्सं ? "

" तुम्ही कुणाकडे उतरणार ? तुम्ही काहीं आमच्या ढेपूळवाडीचे रहिवासी दिसत नाहीं. मीं ओळखलंच ते. " आपल्या बुद्धिमत्तेचा मोठा अभिमान वाटला त्याला.

" मला एका स्नेह्याकडे जायचंय् "

इतक्यात केळसई स्टेशन आलं. व त्यामुळं आमचं बोलणंहि थाबलं. त्या ठिकाणीं गाडी बराच वेळ उभी राहाते. चारपाच तास सारखं बसून राह्यल्यामुळे पाय भरून आले होते. ते जरा मोकळे करण्यासाठीं प्लॅटफॉर्मवरून फिरून आलों.

समोरचा गृहस्थ सुपारी कातरून तोंडात टाकीत होता. त्याच्याकडे पाहून मीं मुद्दामच जरा खवचटपणानं विचारलं.

" चहा चालेल ना आपल्याला ? "

" चालायुला काहीं हरकत नाहीं. पण नुकतीच सुपारी टाकलीयु तोंडात—" गृहस्थ बालबोध थाटात म्हणाला.

" हात्तेच्या ! सुपारी थुंकून टाकली कीं झालं. "

लगेच मीं दोन कप चहा मागविला. चहा घेता घेता सहज

बाहेर नजर टाकली. प्लॅटफॉर्मवर एका बाजूला माणसाची गर्दी झालेली दिसली. गर्दीचं कारण समजेना म्हणून जवळच उभा असलेल्या चहावाल्या पोऱ्यास मीं विचारलं,

" कसली गडबड चाललीयृ रे तिकडे ? "

काय नाय शेट. एक येडा आलायृ बगा तकडं. कधीं येतो असा. तो विंग्रजी असं बोलतो, इचारूं नका !

हे वर्णन ऐकूनसुद्धा मला त्याच्याबद्दल विशेष काहींच वाटलं नाहीं. असेल बिचारा कुणी तरी, असं म्हणून मी स्वस्थच राह्यलों. पण तो माझ्या बरोबरचा गृहस्थ मात्र खिडकीच्या बाहेर तोंड काढून मोठ्या कुतूहलानं त्या गर्दीकडे पहात होता. मध्येच त्यानं त्या पोराला विचारलं,

" कुठलारे तो दाढीवाला का ? "

कपबशा उचलून मी हातावर ठेवलेले पैसे निरखून पाहात तो पोऱ्या म्हणाला,

" हा हा शेट ! तोच तो—"

पोऱ्या कपबशा वाजवीत त्या गर्दीच्याच दिशेला पळत गेला व त्या गृहस्थानं त्या वेड्याविषयीं आपल्याला ठाऊक असलेली माहिती सांगायला सुरवात केली.

" बेकारीच बरं ही ? " तो सांगूं लागला, " तसा तो काहीं कुणाच्या दगड घेऊन मागं लागत नाहीं. बोलायला लागला तर कधीं कधीं असं शहाण्या सुर्त्यासारखं बोलतो कीं ऐकणारा थक्कच होतो. त्याचा दात काय तो श्रीमंतावर ! गरीबाच्या वाटेस जात नाहीं बिचारा ! कुणी जरा झकपक पोशाख केलेला, आगठ्या सलकडी वापरणारा माणूस दिसला कीं उसळलंच याचं डोकं ! आमच्या ढेपूळवाडीलाहि कधीं कधीं येतो तो—"

इतक्यात गाडी सुरूं झाल्यामुळं आमची खिडकी त्या गर्दी-

समोर येऊं लागली. म्हणून मी बाहेर पाहूं लागलों. गर्दीच्या ठिकाणी रेल्वेपोलीस आल्यामुळ तिथली माणसं पागलीं होती. जीं काही थोडी माणस त्या ठिकाणी रेंगाळत होती त्याना व त्या वेड्याला रेल्वे पोलीस हुसकून लावीत होते. मी त्या वेड्याकडे आता निरखून पाहू लागलो. त्याच वय पचवीस सव्वीसपेक्षा जास्त नसाव. त्याच्या डोकीवरल्या अस्ताव्यस्त केसामुळे व त्याच्या बोटबोट वाढलेल्या दाढीमुळे त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा विलक्षण भेसूरपणा आला होता. तो मोठ्या आवेशान बोलत होता—

"बस्स् ते काहीं नाही ! गरीबगुरीबाच रक्त पिऊन माजलेल्या या भाडवलशाहीचा आधीं नायनाट केला पाहिजे. श्रीमंताना मोटारी पाहिजेत, बगले पाहिजेत—"

त्याच्या पाणीदार डोळयात मूर्तिमत त्वेष भरला होता. तो आणखीहि पुढे बोलत होता. पण गाडीच्या धडधडाटामुळे त्याच पुढल बोलण ऐकू येईना.

त्याच्या डोळयातील चमक व त्याची हातवारे करण्याची विशिष्ट लकब पाहून मला गोंधळल्यासारख झाल. गाडीचा वेग वाढू लागल्यामुळे भरभर अस्पष्ट होत जाणाऱ्या त्याच्या आकृतीकडे मी किती वेळ तरी मान वळवून पहात राहिलों होतों.

कुठंतरी, केव्हातरी मीं त्याला पाह्यलं असाव अस मला वाटूं लागल, म्हणून पूर्वस्मृति जागृत करण्याचा मीं खूप प्रयत्न केला. पण छेः ! मी अधिकच बुचकळ्यात पडलों; व पायात भरलेले कुसपट निघत नसल कीं जसा अस्वस्थपणा वाटतो तशी स्थिति झाली माझी.

किती वेळपर्यंत तरी मी त्याच्याच विषयीं विचार करीत होतों.

कोण बर असावा तो ? त्याला वेड लागावं अस कोणतं कारण

घडल असाव ? त्याच्या बोलण्यावरून तो भाडवलशाहीचा कट्टा शत्रू दिसतोय. भाडवलशाहीचा असा कोणता जाच त्याला सोसावा लागला असेल कीं त्याच मन तिच्याविषयीं इतक कड-वट बनाव ?

एका मागून एक आणखी खूप विचार येत होते त्याच्यासबधीं पण ते थाबविण्याचा निश्चय करून मी मनाशींच पुटपुटलों, " चला जाऊ द्या ते ! या वेड्याचा विचार करता करता आपल्या-लाच वेड लागायच ! "

* * *

ढेपूळवाडी स्टेशनवर उतरताच गोपाळशेटजीच्या माणसाची गाठ पडली. शेटजींनीं माझी राहाण्याची सोय ' वसताश्रम ' नावाच्या तिथल्या एका दक्षिणी लॉजमध्यें केली होती. ताबडतोब व्हिक्टोरीया करून मी त्या माणसाबरोबर ' वसताश्रमा 'त दाखल झालों. माझी सगळी नीट व्यवस्था लावून झाल्यावर शेटजींचा मनुष्य निघून गेला.

दुसऱ्या दिवसापासून मी शेटजींच्या कामाला सुरवात केली. काम शक्य तितक्या लवकर उरकाव अशी माझी इच्छा होती; परंतु ते निदान चार पाच दिवसात तरी पुर होण्यासारख नव्हत. इमारतीसाठी शेटजी निदान ४०–५० हजार रुपये तरी खर्चणार होते; म्हणून प्लॅन नक्की करण्याच्या कामात बिलकूल घाई होऊ नये अस त्याच म्हणण होत.

पहिल्या दोन दिवसात शेटजींच्याबरोबर कामासबधीं बोलण्यात व इतर गप्पागोष्टी करण्यात बराच वेळ निघून गेल्यामुळं, मला गावात फारसं भटकायला मिळालच नाहीं. पण ज्या भागात मी थोडंसं फिरलों त्यावरून मला असं कळून चुकल कीं गेल्या नऊ दहा वर्षात ढेपूळवाडीचं स्वरुप पार बदलल आहे.

पूर्वीच्या जुन्या मोडकळीस आलेल्या घराच्या जागीं अनेक सुंदर सुदर इमारती दिसत होत्या. निरनिराळीं दुकान, खानावळी, दवाखाने हीं निघाल्यामुळें बाजार पेठ बरीच वाढली होती. गोपाळशेटजींनींच गावात एक रगाचा जगी कारखाना काढला होता. या कारखान्यात पुष्कळ माणसाना काम मिळाल्यामुळें आसपासची बेकारी बरीच कमी झाली होती.

एक दिवस सध्याकाळीं, जरा लवकरच मी फिरायला निघालों होतों. शेटजींच काम जवळ जवळ सपलेल असल्यामुळें त्या संबंधींच्या विचाराची जागा आता एकाच विचारान घेतली होती.

मुक्तामावशी कुठ असतील ? कुठ भेटतील ?

मुक्तामावशीसबधीं काहीं तरी हकिकत समजावी म्हणून मन अगदीं उत्सुक झाल होत.

फिरता फिरता रामाच्या देवळाजवळ आलों. देवळाच्या बाजूला असलेल्या तलावाकडे दृष्टि जाताच लहानपणीचे अनेक मधूर प्रसग डोळ्यासमोर नाचू लागले; व पाऊल पुढें पडेनास झालं. मग जवळच असलेल्या वडाच्या पारावर बसून, मी त्याच चितन करण्यात गुंग झालों.

यानंतर जवळ जवळ अर्धा तास लोटला असावा. रामाच्या देवळात सुरू झालेल्या मद मद घंटा नादानं मी भानावर आलों. व माझी नजर त्या दिशेकडे गेली. देवळातलं पुराण नुकतंच सपल होतं. भाविक श्रोतृवृंद आपसात निरनिराळ्या विषयावर कुजबूज करीत बाहेर पडला होता. त्यात पुरुषाच्यापेक्षा स्त्रियाचाच जास्त भरणा होता. हळुं हळु बहुतेक सर्वजण निघून गेले. सर्वाच्या मागून एक साधारण उतार वयाची विधवा जड पावलं टाकीत पुढ येत होती. चट्कन माझं लक्ष तिच्याकडे वेधल. तिच्या सात्विक चेहऱ्यावर पुरत गांभीर्य पसरलं असून, तिच्या चालीत एक प्रकारचा

निश्चय प्रतीत होत होता. तिच्या दृष्टींत पुरेपूर भरलेलं एक प्रकारचं तापसी तेज पाहून मला तिच्याविषयीं जितका आदर वाटला तितकच कुतूहल वाटल.

मी वेड्यासारखा तिच्याकडे टक लावून पाहू लागलो, पण मन मात्र स्मृतिपटावरील फार वर्षांपूर्वीच्या कुठल्यातरी एका मूर्तीचं चित्र समोरून अधोवदनानं मंद मद पावल टाकीत पुढ येणाऱ्या मूर्तीशीं पडताळून पाहात होतं. मनाची खात्री पटताच माझ्या तोंडून नकळत शब्द निघाले—

" हो ! त्याच त्या ! शकाच नको. "

नतर कसलाच विचार न करता पुढे होऊन मीं त्या स्त्रीला मोठ्यान हाक मारली,

" मुक्ता मावशी—"

मुक्ता मावशी गोंधळून माझ्याकडे पाहूं लागल्या. तेव्हा फिरून मीं म्हटलं,

" मुक्तामावशी नाहीं ओळखलत मला ? "

" कोण—वसंत का रे ? कस ओळखणार ? केवढा मोठा वाढलायस्—"

नतर एक लाबलचक सुस्कारा सोडून अर्धवट आपणाशींच व अर्धवट मला उद्देशून त्या पुढ म्हणाल्या,

" चला ! तुला तरी आठवण आहे म्हणायची मुक्तामावशीची ! "

नतर, ' चला, तुमच्याकडेच जाऊं या. मग सावकाशीन बोलू ' असं म्हणून मी मुक्तामावशींच्या बरोबर त्याच्या बिऱ्हाडाकडे जायला निघालों. सारी वाट अगदीं मुकस्तंभासारखा चालत होतों; कारण मुक्तामावशींच्या वृत्तींत काळाने घडवून आणलेला एकदर फरक पाहून माझी मनःस्थिति चमत्कारिक झाली होती—मी भांबावल्यासारखा झालों होतों. चालता चालता मी त्या फरकाच

कारण शोधण्याचा प्रयत्न करू लागलों.

काय बरं झालं असावं ? मोहन छदी फंदी निघाला असेल का ? पण ते शक्यच नाहीं ! मग दुसर काय कारण असाव ? बेकारी ? मोहन सारखा हुशार तरुण बेकार राहावा ? शक्य आहे ! आज किती तडफदार तरुण आपल्या डोळ्यादेखत बेकारीच्या आगींत होरपळून निघत आहेत ?

मी खूप प्रयत्न केला पण मुक्तामावशींच्या बरोबर काय बोलावं तेच मला समजेना. मुक्तामावशीचीहि तीच अवस्था झाली असावी.

अशा रीतीन दहाबारा मिनिट वाट चालल्यावर आम्ही बिऱ्हाडापाशी आलों.

एका बैठ्याच पण टुमदार घराच्या मागल्या पडवींत मुक्तामावशीच बिऱ्हाड होत. पडवींत साधारण काळोखच होता. आत गेल्यावर मी खिडकीजवळच एका वळकटीवर बसलों.

नतर, हल्ली मी कुठ असतों, काय करतों, आई वडील कुठ आहेत वगैरे प्रश्न व त्याचीं उत्तर औपचारिक रीतीनच उरकली.

आता यापुढ मुक्तामावशीच्या तोंडून त्याच्या खडतर नशिबाची करुण कहाणी ऐकू येणार अशी माझी खात्री होऊन चुकली, व त्यामुळे छाती धडधडू लागली माझी.

थोडावेळ मुक्तामावशी स्तब्धच होत्या. जणू काय, भोंवतालच्या जगानं केलेल्या अन्यायाचा उच्चार करण्यासाठीं त्या आपल मन बळकट करीत होत्या.

त्या बोलू लागल्या,

" वसत, तूं भेटलास—किती बरं वाटल मनाला ! आज किती दिवस, मी कुणाकडे तरी आपल मन मोकळ करायची वाट पाहातेय् रे ! जीवाचा कोंडमारा झालाय् नुसता—

" मला वाटत, या गोष्टीला दहा एक वर्षं तरी झालीं असतील.

तुम्ही एकाएकी ढेपूळवाडी सोडून गेल्यामुळं एक मोठा आधार सुटल्यासारख होऊन मन अगदीं वेडं झालं होत माझ. कितीक दिवस तरी चैन पडेना. अगदीं चुकल्यासारखं वाटत होत. पण दुर्दैवाला बोल लावून स्वस्थ राहाण्याखेरीज काहींच करता येण्या-सारख नव्हत मला.

" त्यावेळीं मोहन मॅट्रीकच्या वर्गात होता. तो पास झाला कीं अंगावरची एक मोठी जबाबदारी आता पार पडणार या जाणीवेन तेवढंच दुःखात सुख वाटायच. "

" पुढ मोहन मॅट्रीक पास झाला. केवढा आनद झाला आम्हा मायलेकराना ! तपश्चर्येच फळ मिळाल्याचा आनद होता तो ! पण तो लवकरच मावळून गेला; नि वीज चमकून गेल्यावर अंधः-कार अधिक भयंकर वाटतो ना, तस झाल अगदी.

" आईच्या मागले कष्ट थाबावे अशी मोहनची फार इच्छा होती. तेवढ्यासाठी कुठतरी एकादी नोकरी मिळवावी म्हणून तो मोठ्या उमेदीनं खटपट करीत होता.

" दिवस भरभर निघून जात होते; पण मोहनला कुठच नोकरी मिळेना. त्यान नाउमेद होऊ नये म्हणून मी त्याला खूप धीर देत असें. पण पुढ पुढ त्याचा काहींच उपयोग होईना. माझाहि धीर सुटत चालला होता. सध्याकाळच्या वेळीं तो निराश होऊन घरीं परत येई, तेव्हा त्याचा केवीलवाणा चेहरा पाहून अगदीं भडभडून येई मला.

" म्हणता म्हणता चार वर्षे निघून गेली. अलीकडे मला पूर्वीच्या सारखीं काम मिळेनात, त्यामुळं खर्चाची फार ओढाताण व्हायला लागली. मोहनला एक दोन मुलाच्या शिकवण्या मिळाल्या होत्या, पण त्याबद्दल नोकरी लावण्याच्या कोरड्या आश्वासनापलीकडे त्याच्या पालकाकडनं काहींच मिळत नसे त्याला.

" एक दिवस संध्याकाळीं मोहन घरीं आला तो जरा हसतच. फार दिवसात त्याच्या चेहऱ्यावर असल हास्य दिसल नव्हत मला. त्यामुळ आज मला आश्चर्य वाटल्यावाचून राहिल नाही. मींहि त्याच हंसतच स्वागत केल,

" ' मोहन कुठ जमतय कारे नोकरीच ? ' मीं मोठ्या उत्सुकतेनं विचारल. "

" ' नोकरीच ग कशाला ? मीं एक दुसराच मार्ग काढलाय् आई ' तो उत्साहान म्हणाला.

" मी आश्चर्याने टकमक पाहू लागले. "

" तो पुढ म्हणाला, ' बाजारपेठेत नुकतीच एक जागा रिकामी झालीय्. त्या जागेत एक लहानशीच नारळाची वखार काढायचा विचार ठरतोय् माझा. थोडासा भाजीपालाहि ठेवायूचा.

" माझ्या डोळयासमोर चटकन् आमची आर्थिक असहाय्यता उभी राहून मीं म्हटल,

" ते खर मोहन पण—"

" मला पुढ बोलू न देता तो म्हणाला, ' पैशाचच म्हणतेस ना ? त्याचीहि व्यवस्था झालीय्, आई. तात्यासाहेब देशमूख—देवमाणूस आहेत बिचारे ! त्यानींच मला पैशाची मदत द्यायच कबूल केलय्. त्याच बाबतीत बोलण नक्की करण्यासाठी उद्या मला आपल्या घरीं बोलावलय् त्यानी. '

" यावर मी काहींच बोलले नाहीं. म्हटल नसत्या शकाकुशंका काढून कशाला निरुत्साह करायच त्याला.

" अलीकडे नोकरीच्या काळजीमुळ मोहन अबोलका झाला होता. पण त्या रात्रीं तो बराच उशीरपर्यंत खूपखूप बोलत होता; आपले पुढले बेत मला पुनः पुन्हा समजाऊन सागत होता. मी नुसतं ' हूं, ' ' हूं, ' करीत होते. मनात मात्र म्हणत होते, किती

खुळा आहे मोहन ! जगाचा अनुभव नाहीं याला.

" दुसरे दिवशी सध्याकाळीं भिडे मास्तराच्या घरचीं भाडीं धुणीं उरकून मी घरीं येऊन पाहाते तर मोहन गुडघ्यात डोकं घालून स्फुदून स्फुदून रडतोय्. केवढ्यान दचकले मी ! पाय लटलटू लागले माझे. मी एकदम मोहनला पोटाशी घट्ट धरून म्हटल,

" ' मोहन, मोहन—कायरे अस झाल, मोहन ? "

" मोहन अधिकच रडू लागला. मी त्याला विचारलं. "

" मोहन तात्यासाहेबाकडे गेला होतास का ? काय झाल तुझ्या पैशाच ? "

" कसले पैसे नि कसल काय ! आई, कुणीच नाहीं का ग जगात आपल ? आई,—तात्यासाहेब देव नाहींत, माणूसहि नाहींत; नुसते राक्षस आहेत ग ! माझ्या महत्त्वाकाक्षेचा पार चुराडा करून टाकलाय् त्यानी. "

नतर हळु हळु मला सर्व हकिगत समजली. तात्यासाहेब मोहनला ऐवजाशिवाय पैसे देईनात, कारण मोहनसारख्या अननुभवी माणसाला धद्यासाठीं नुसत्या प्रामिसरीवर पैसे देण त्याच्या व्यवहारी दृष्टीन धोक्याच होत. पण जवळ तसा ऐवज असता तर आम्ही तो कशाला ठेवला असता ? मोहननं त्याच्यापाशी खूप गयावया केली पण ते ऐकेनात. शेवटीं नाईलाज होऊन मोहन रडतच घरी आला. "

या आठवणीबरोबर मुक्तामावशींच्या डोळ्यावाटे खळखळ अश्रू ओघळूं लागले, दिवे लागणीची वेळ होऊन गेलेली असल्या-मुळं पडवींत बराच अंधार झाला होता. मुक्तामावशी तशाच उठल्या व दिवा लावून मला म्हणाल्या,

" वसंत, उशीर नाहीं ना होत तुला ? नाहींतर म्हणशील—"

" छे: ! उशीर कसला ? इतक्या वर्षांनी भेट झालीय् तुमची नि—"

मुक्तामावशी पुढ सागू लागल्या,

" या प्रसगाचा आघात मोहनला चागलाच जाणवला. कित्येक दिवस त्याच जेवण्याखाण्याकडे सुद्धा लक्ष लागेना. कधीं कधीं तो झोपेतून बरळत उठायचा. पण बाळ, गरीबानी आपल्या जखमाचा विचार करायचा नसतो कधीं !

" ही गोष्ट मनाला लावून घेण्यात अर्थ नाहीं, असे प्रसग गरीबावर नेहमीच यायचे हे मोहनला पुढ पटू लागलं.

" याच सुमारास गोपाळशेटजींनी इथ एक रगाचा कारखाना काढला. त्यात पुष्कळ माणस कामाला लागली. मोहन तिथ नोकरीची खटपट करीत होता. बऱ्याच दिवसानीं त्याला नोकरी मिळालीहि. मात्र सुरुवातीला तीन महिने बिनपगारी काम करायच होत.

" कारखान्यातल काम फार त्रासाच होत, पण मोहन ते मोठ्या आनंदान करीत असे. मलाहि आता दुप्पट उत्साह वाटत होता. म्हटलं, देव काही अगदींच टाकीत नाही कुणाला !

" मोहनला नोकरी लागून तीन महिने होत आले. आता चौथ्या महिन्यापासन त्याला पंचवीस रुपये पगार सुरू व्हायचा होता. एक दिवस सध्याकाळीं त्याला पहिल वाढून झाल्यावर मीं म्हटल,

" 'मोहन, पुढल्या महिन्यपासन तुला पगार सुरूं व्हायचाय्.'

" 'ह.'

" 'सितळादेवीची कृपा बर ही !'

" मोहनन हसून विचारल, 'मग ?'

" 'मग काहीं नाहीं. मी एक नवस बोललेय् देवीला. तुझ्या पहिल्या पगारातून दहा रुपये देवीच्या पुजापात्रासाठीं खर्चायचे—'

" 'दहाच ? सगळाच पगार देईन की !'

" पण आमचा हा बेत देवाला पसत नव्हता अस दिसतं.

" यानतर तिसऱ्या कीं चवथ्याच दिवशीं मोहनला थडी लागून खूप ताप भरला. तशा तापातच तो कामावर जात होता, पण मीं त्याला जाऊ दिल नाही. या क्षुल्लक गोष्टीचा किती भयंकर परिणाम झाला !

" कारखान्याच्या मॅनेजरला येवढंच कारण बस्स् झाल. त्याच्या ओळखीच्या एका माणसाचा भाचा रिकामा होता. त्याला नोकरीला लावण्याचं त्याच्या कधींपासनं मनात होत, पण कारखान्यात आणखी जागाच नव्हती. मोहन घरीं राहिल्यान त्याला आयतीच सधि मिळाली. त्यानं त्याच्या जागीं तावडतोब त्या माणसाला लावून टाकल.

" तीन चार दिवसानी मोहन जेव्हा कारखान्यात गेला, तेव्हा त्याला हा सारा प्रकार समजला. मग त्यान तावडतोब मालकाकडे जाऊन आपल्याला नोकरीवर ठेवण्याबद्दल त्याची खूप विनवणी केली. पण मॅनेजरन आधीच त्याचे चागले कान फुकून ठेवलेले असल्यामुळं मोहनच तो काहीच ऐकेना. शेवटीं निराश होऊन मोहन घरीं परत आला.

" त्या दिवशीं तो किती किती रडत होता. त्याला कस उगी कराव तेच मला समजेना. रडता रडता तो तोंडान म्हणत होता, 'आई, देवीसुद्धा किती निष्ठुर आहे ग ! मीं तिला माझा पहिला पगार द्यायच ठरविल होतं, पण तिनं तो मला मिळूच दिला नाहीं ग !...'

" त्या दिवसापासनं मी मोहनला अंतरले. "

" एकंदर प्रकारामुळं मोहनला मनस्ताप फारच झाला. मीं त्याला शात करण्याचा खूप प्रयत्न केला, पण व्यर्थ ! तो श्रीमत

लोकाबद्दल व भाडवलवाल्याबद्दल खूप चरफडून बोलायचा. हल्लीं-सुद्धा तो त्याच्या अन्यायाचा पाढा वाचीत आसपासच्या गावात हिंडत असतो. पण खडकाशी टकरा मारणारा स्वतःच जखमी होतो. खडक फोडण्यासाठी सुरूगच लावायला हवा."

"जगान मोहनला वेडा ठरवल."

यापुढ दुःखातिशयामुळ मुक्तामावशींच्या तोंडून शब्द निघेना. मोहनची ही हृदयद्रावक हकिगत ऐकून माझेहि डोळे डबडबले. चट्‌कन मला त्या दिवशीं येताना केळसई स्टेशनवर पाहिलेल्या वेड्याची आठवण झाली.

कल्पनेनच मी त्याच्या चेहऱ्याकडे पाहू लागलो. शेवटीं त्याची ओळख पटताच मीं कळवळून म्हटल,

"मोहन, कायरे ही तुझी दशा!!"

# शेजारी

१०

सकाळीं आठ साडेआठची वेळ होती !

आपल्या टुमदार बगलीच्या अद्यावत् पद्धतीने सजविलेल्या दिवाणखान्यात एका आराम खुर्चीवर रेलून मिस्टर डिसोझा आदल्या दिवशीचा इव्हिनिंग न्यूज विलक्षण अप्रसन्न मुद्रेने चाळीत होते. त्याचा आवडता टॉम नेहमींचा लडिवाळपणा विसरून, धन्याच्या चेहऱ्यावरील क्षणाक्षणाला बदलणारे मिश्र भाव एकाग्रतेने न्याहाळीत होता. मधून मधून क्वचित् तो शेपटीची चाळवाचाळव करून पुढे सरकल्यासारखे करी, पण साहेबाची रागीट मुद्रा पहाताच तो तसाच दबून जाई. कालच्या घोड्याच्या शर्यतींत 'रॉयस प्रिन्स' वर गैरवाजवी भरवसा टाकल्यामुळे डिसोझासाहेब कसे तोंडघशी पडले होते व त्याचा खिसा किती हलका झाला होता याची त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्याला यत्किंचित् जरी कल्पना असती तरी तो यावेळीं त्याच्यासमोर बसण्याचे धाडस करता ना ! असो.

अशा स्थितींत बराचसा वेळ निघून गेल्यावर डिसोझा साहेब एकदम उठले व हातातील इव्हिनिंग न्यूज टेबलाच्या रोखाने भिरकावून देत ओरडले—

"डॅम दॅट रॉयल रोग !

त्याचवेळीं आपल्या अनपेक्षित ओरडण्याने दचकून केकाटत उठलेल्या टॉमच्या सर्वांगाचा होणारा थरकाप पाहून तशाहि स्थितींत त्याना अनिवार हसू कोसळल्यावाचून राहिले नाहीं.

त्यानीं टॉमला अलगद उचलून हृदयाशीं धरलें व त्याच्या डोक्यावरून प्रेमभराने आपला डावा हात फिरवीत ते मृदु स्वराने म्हणाले,

"यू माय डियर लिट्ल फूल!—डोण्ट बी अफ्रेड."

पण साहेबाच्या या प्रेमळ शब्दाचा मारा सहन करण्याची टॉमची त्यावेळीं तयारी नव्हती असे दिसते; कारण एकाद्या मुरब्बी देशभक्ताप्रमाणें त्याने साहेबाशीं सहकार्य करण्याचे अजिबात नाकारून त्याच्या हातून आपली सुटका करून घेण्याची सनदशीर चळवळ सुरू केली. साहेबहि अगदीं हट्टास पेटले होते. येवढेसे कुतुरडें पण मिजास कोण! त्यानी त्याला आजारून गोंजारून पाहिले, खिडकीपाशी नेले, पण छेः! त्याची धडपड अधिकाधिक गभीर होत होती.

याचवेळीं मिसेस डिसोझा ताज्या फुलाची फुलदाणी घेऊन वर आल्या होत्या. आज त्याना साहेबास काहींतरी विशेष महत्त्वाची बातमी सागावयाची होती. कुत्र्याशीं चालेला नवऱ्याचा पोरखेळ पाहून त्या जराशा चिडक्या स्वरानें म्हणाल्या—

"कनाला तरास देता त्याला—"

इतक्यात टॉमनें मोठ्या शिताफीनें आपली सुटका करून घेतली व जीव घेऊन बाहेर धूम ठोकली.

मिसेस डिसोझाना हायसे वाटले. त्या पुढें म्हणाल्या,

"कालच कोनी मानस आयलीत त्या बंगल्यात "

बायकोनें मराठींत सुरू केलेले वक्तव्य ऐकून साहेबाना मनस्वी संताप आला. तिने मोडके तोडके का होईना, पण इग्रजींत बोलावें असा त्याचा नेहमीं हट्ट असे. मराठी भाषेचा त्याना विलक्षण तिटकारा होता. अन् इंग्रजी भाषेवर जरी त्याचें तसें प्रभुत्व नसले तरी तिच्याबद्दल साहेबाना पराकाष्ठेचें प्रेम वाटत होतें.

पण साहेबांच्या रागाची कल्पना असूनहि मिसेस डिसोझा आज 'मायबोलीं'तच बोलत होत्या—

"आयकिलं का ? भूतबंगल्यात कोनी मानसं आयलीत काल—"

भूतबंगल्याचे नाव ऐकताच्च सगळा राग झटकन् गिळून, साहेब बायकोकडे भेदरटपणानें पाहूं लागले. प्रसगाचें गांभीर्य त्याच्या तत्क्षणी ध्यानात आलें. इग्रजीचा विलायती हट्ट धरून बसण्याची ती वेळ नव्हती.

आता कुणी म्हणेल शेजारच्या रिकाम्या घरात कुणी राहाण्यासाठीं आले तर त्यात साहेबानी इतके चमकण्यासारखे काय आहे ? उलट नवा शेजारी मिळाल्याबद्दल त्याना आनंदच व्हायला पाहिजे. पण वरून जरी हे विचित्र दिसत असले तरी त्याचें कारणहि तसेच आहे.

*   *   *

तीस वर्षे रेल्वेत इमानें इतबारे नोकरी केल्यानतर फड म्हणून मिळालेल्या मोठ्या रकमेतून दहा हजार रुपये खर्चून डिसोझासाहेबानी तीन वर्षापूर्वीच ते सध्या राहात असलेले टुमदार घर बाधले होते. त्याच्या घराच्या उजव्या हाताला जे जमिनीचे अनेक खड ( Plot ) होते, त्यात उभारली गेलेली सर्व घरें त्याच्याच जातभाईचीं होतीं. डाव्या हाताकडे एकच राहिलेला खंड मात्र तसाच पडून राहिला होता. पुढें मागें त्याच्यातहि आपल्याच जात-भाईचें घर व्हावे अशी साहेबाची उत्कट इच्छा होती. पण दुर्दैवानें एका 'मूर्ख' गुजराथ्याला तो खड घेऊन त्यात घर बाधण्याची दुर्बुद्धि झाल्यामुळे अखड 'कॅथॉलिक कॉलनी' करण्याचा साहेबाचा मनसुबा पार धुळीस मिळाला !

तरीपण साहेबानी धीर सोडला नव्हता. आपल्या गुजराथी शेजाऱ्याला 'येन केन' पळून लावण्याचा त्यानीं चंग बाधला. आपण त्याचे शेजारी नसून कट्टे शत्रू आहोंत अशी आपल्या मनाची समजूत करून घेऊन त्यानीं त्याच्याशीं कुठल्याहि प्रका-

रचा संबंध ठेवायचा नाहीं असा ठाम निश्चय केला. इतकेंच नव्हे तर त्याच्या घरातल्या कुणाहि माणसाच्या चेहऱ्यावर बिलकूल नजर घालायची नाहीं असा आपल्या घरात सक्त हुकूम काढला. सुरवातीला बरेच दिवस शेव गाठीया, खमण, पात्रा इत्यादि जिन्नस तयार करण्यात व त्याचा समाचार घेण्यात दंग असलेल्या त्या गुजराथी कुटुंबाला आपल्या शेजाऱ्यानें घातलेला बहिष्कार समजलाच नाहीं, पण नतर तो लक्षात आल्यावरहि त्याबद्दल त्यानें विशेष फिकीरी दर्शविली नाहीं.

मध्यतरीं डिसोझा साहेबानी एक नवाच कावा लढविला. दर अमावास्येला त्याच्या घराभोंवतीं भुताची फेरी होत असल्याची हूल उठवून गावात तिचा प्रसार करण्याची त्यानीं व्यवस्था केली. लवकरच जो तो त्या घराचा ‘ भूतबगला ’ या नावानें उल्लेख करू लागला.

एक दिवस अचानकपणें टाइम्स वाचीत असताना डिसोझा साहेबाना शेजाऱ्याने आपला बंगला विक्रीस काढल्याचें कळून आलें. त्यावेळीं त्याना केवढा आनंद झाला त्याची नुसती कल्पनाच केलेली बरी ! पण थोड्या वेळानें एक नवी शंका मनात डोकावताच त्याचा आनंद पार मावळला. नवा मालक आपला जातवालाच येईल असें कशावरून ? दुसराच कुणीतरी आला तर ?......

या शकेबरोबरच साहेबाची मुत्सद्देगिरी जागृत झाली. काय वाटेल तें होवो, पण आपल्या जातवाल्याशिवाय दुसऱ्या कुणाला शेजारीं येऊ द्यायचेंच नाही असा त्यानीं निश्चय केला.

अन् थोडा वेळ विचार केल्यावर साहेबाना एक युक्ती सुचली. व त्याप्रमाणें लागलीच डिकूना नावाच्या आपल्या एका दूरच्या नातेवाईकाला गाठून त्यानी त्यास तो बंगला विकत घेण्याची गळ घातली. प्रथम डिकूनानानें आपल्या अनेक अडचणी दाखवून

सध्या घर घेण्याचा आपला विचार नसल्याचें सांगितलें. पण डिसोझा साहेब म्हणजे कसली वल्ली ! त्यांनीं तऱ्हतऱ्हेचे युक्तिवाद लढवून शेवटीं बिचाऱ्या डिकूनाकडून घर घेण्याबाबत त्या गुजराथी माणसाशी बोलणें सुरू करण्याचें आश्वासन घेतलेच !

दोन महिन्यापूर्वींच शेजारचें गुजराथी कुटुंब घराला कुलूप ठोकून देशावर गेलें होते.

इकडे डिसोझा साहेब डिकूनाच्या आश्वासनावर विसबून निर्धास्त राहिले असल्यामुळें ' इलस्ट्रेटेड वुइकली ' मधील कोडीं सोडविणें, शर्यतीचे ' शुवर ' घोडे काढणें, वगैरे त्याचे महत्त्वाचे व्यवसाय निर्वेध चालले होते.

यामुळें अशा परिस्थितीत आज बायकोनें नवीन माणसे शेजारीं राहायला आल्याचे सांगितले तेव्हा त्याना चांगलाच धक्का बसला. इतकेच नव्हे तर अधिक चौकशीअंती जेव्हा त्याना आपला शेजारी रावसाहेब गोळे नावाचा कुणी मराठा गृहस्थ आहे असे समजलें तेव्हा तर त्याचें मनःस्वास्थ्य एकदम बिघडलें.

* * *

रावसाहेब गोळ्याचें आगमन म्हणजे डिसोझा साहेबाच्या मुत्सद्देगिरीला मोठाच शह होता. अन् म्हणूनच डिकूनावर विश्वासून राहिल्याचा त्याना फार पस्तावा झाला.

गोळ्याना ' गार्डनिंग ' चा मोठा नाद होता. थोड्याच दिवसात त्यानी आपल्या घरासभोंवती सुंदर बाग तयार केली. अष्टौप्रहर बागेत त्याचें कांहींना कांहीं काम चाललेलें असायचें. अशावेळीं जेव्हा जेव्हा खिडकींत उभ्या असलेल्या डिसोझा साहेबाची त्याच्याकडे सहज नजर जाई तेव्हा तेव्हा पराभवाची विचित्र जाणीव त्याच्या मनाला दंश करीत असे.

अशा रीतीनें दिवसांमागून दिवस जात होते. पण साहेबाची

आपल्या शेजाऱ्याविषयींची अढी कमी होण्याचा सुतराम संभव दिसत नव्हता. उलट त्याचा द्वेषभाव सारखा वाढत होता.

रावसाहेब गोळ्याना मात्र आपल्या शेजाऱ्याच्या घुमेपणाचें विलक्षण कोडे पडले होते. त्यानें आपल्याकडे यावें, बोलावें, हास्य विनोद करावा असे त्याना फार फार वाटत होते. अन् ते साहजिकच होते.

पण मग जेव्हा त्याना आपल्या या विचित्र शेजाऱ्याची भूमिका स्पष्ट कळून आली तेव्हा त्याना खूपच गमत वाटली. रावसाहेब गोळ्याची मनोवृत्ति स्वभावतः खिलाडू असल्यामुळें, तिला साजेसाच पवित्रा धारण करून त्यानी डिसोझा साहेबाच्या 'पॉलीसी'ला तोंड द्यायचें ठरविले.

काही तरी कुरापत काढून गोळ्याशीं कोर्टदरबार करायचें अशी डिसोझा साहेबाची फार इच्छा होती. तिला अनुसरून केळयाच्या व सऱ्याच्या साली, सडका भाजीपाला, अंड्याचीं कवचें इत्यादिकाचा वर्षाव गोळ्याच्या बागेत नेहमी होत असे. पण यामुळे चिडून जाण्याऐवजीं रावसाहेबानी त्या टाकाऊ जिनसाचें फुलझाडासाठी खत तयार करण्याचा उपक्रम सुरू केल्याचें जेव्हा डिसोझा साहेबाना समजलें तेव्हा त्याच्या मनाचा झालेला चरफडाट तर विचारूच नका !

माणसाच्या स्वभावाची गंमत तर हीच आहे. त्यानें विशिष्ट हेतू धरून एकादी गोष्ट करावी अन् तिचा परिणाम अगदीं त्याच्या उलट व्हावा म्हणजे त्याच्या मनाचा होणारा हिरमोड फार भयंकर असतो.

डिसोझा साहेबाचेंहि असेच झाले नि तेव्हापासून आपल्या शेजाऱ्याची प्रत्येक हालचाल आपल्याला चिडविण्यासाठींच हेतुपुरःसर होत असते अशी त्याची समजूत होऊन बसली.

सकाळीं किंवा सध्याकाळीं आजूबाजूची निसर्गशोभा पहात

गभीर मुद्रा करून उभे राहिलेल्या डिसोझा साहेबाना त्याचवेळीं रावसाहेब गोळयाच्या बागेंत हास्य-विनोदाला उत आलेला दिसे. दुपारच्या वेळीं साहेबानी आपले आवडते इग्रजी रेकॉर्ड ग्रामोफोनवर लावले कीं अगदीं अचूक त्याचवेळीं रावसाहेब गोळयाना ' भिकारडें ' मराठी रेकॉर्ड लावण्याची लहर येई. दर शनिवारीं किवा बुधवारीं शर्यतीच्या निमित्तानें जेव्हा जेव्हा डिसोझा साहेब घराबाहेर पडत तेव्हा तेव्हा त्याची स्टेशनवर रावसाहेब गोळयाशीं ' युति ' होत असे. या विलक्षण योगायोगाच्या मागेहि प्रतिस्पर्ध्याचा काहीं तरी मिस्किल हेतू असावा असा त्याना दाट सशय येई.

* * *

तसें पाहिले तर तो दिवस डिसोझा साहेबाच्या आयुष्यात ' सोनियाचा'च ठरेल. कारण शेजाऱ्याची खोड मोडण्यासाठीं ज्या सधीची ते आज इतके दिवस सारखी वाट पाहात होते ती आज अगदीं चालून आली होती.

डिसोझा साहेबाचा टॉम हा चागला कुत्रा होता व तो त्याना अतिशय आवडत असे. अगदीं लहान असताना साहेब त्याला साखळीने बाधून ठेवीत. पण अलीकडे तो सुटाच असे. त्यामुळे हल्लीं त्याला बाहेर हवें तसे बागडायला मिळे. गेल्या चार पाच दिवसापासून त्याला बागडण्यासाठीं आपल्या धन्याची जागा अपुरी वाटून कीं काय त्याने शेजारीं गोळयाच्या बागेंत मुलुखगिरी करण्यास सुरूवात केली होती. डिसोझा साहेबाच्या हे ताबडतोब लक्षात आले, पण त्यानीं त्याचा बिलकूल बदोबस्त केला नाहीं; उलट त्यानीं त्याच्या आक्रमणशील वृत्तीचें कौतुकच केले.

अखेर व्हायचे तें झाले ! गेल्याच आठवड्यात रावसाहेब गोळयानीं बाहेर गावाहून सूर्यफुलाचीं काहीं रोपटीं आणून बागेत

लावलीं होतीं. नुकतींच कुठे तीं जीव धरायला लागलीं होतीं. त्यातल्या दोन तीन रोपट्याचा सकाळीं टॉमनें बागडताना बळी घेतला होता. गोळ्याच्या नोकराला टॉमचा हा वाह्यातपणा बिलकूल रुचला नाहीं. त्यानें रागाच्या भरात त्याच्या मागल्या तगडीवर काठीने दोन रट्टे ओढले. दुसऱ्याच क्षणीं किंकाळी फोडत टॉमने तीन पायानींच घरचा रस्ता धरला.

झाले ! तापलेल्या दारूच्या कोठारात ठिणगी पडावी तसे झाले. डिसोझा साहेबाच्या सर्वांगाचा नुसता दाह झाला. रावसाहेब गोळ्याना खाऊ की गिळू असे त्याना होऊन गेले. पण त्याच्या-बरोबर शाब्दिक बखेडा करण्याची त्याची इच्छा नव्हती. कारण तसे करणे आपल्या दर्जाला शोभण्यासारखे नाहीं असे त्याना मनापासून वाटत होते. म्हणून त्यानीं टॉमला ताबडतोब औषधोप-चारासाठीं दवाखान्यात पाठवून परेरा वकीलाकडून रावसाहेब गोळ्याना एक ठणठणीत नोटीस देण्याची व्यवस्था केली.

दुसऱ्या दिवशीं रावसाहेब गोळ्याना खालील आशयाची नोटीस मिळाली—

ज्या अर्थी आमचे अशील मिस्टर × × डिसोझा याच्या आवडत्या कुत्र्याच्या मागल्या डाव्या पायावर केवळ द्वेषबुद्धीनें तुम्हीं आपल्या नोकराकडून दुखापत करविलीत त्या अर्थी तुमच्या-वर कायदेशीर इलाज का करूं नये ? वगैरे वगैरे.

यानतर एक आठवडा लोटला तरी रावसाहेब गोळ्याकडून नोटीशीचें उत्तर आले नाहीं. डिसोझा साहेबाना तरी कुठे त्याची जरुरी होती. त्याची एकच इच्छा होती, ती म्हणजे गोळ्याना कोर्टात खेचायचे !

शर्यतीचा ' सिझन ' आता सपत आला होता. राहिलेला एक दिवस झाला कीं फिर्यादीचें काम हातीं घ्यायचें असें डिसोझा

साहेबानीं ठरविलें.

* * *

त्या दिवशीं डिसोझा साहेब जे शर्यतीहून घरीं आले ते जवळ जवळ भ्रमिष्टावस्थेतच. त्याचें डोके सारखे गरगरत होते. 'इव्हिनिग-न्यूज'मध्ये छापलेल्या शर्यतीच्या निकालाने त्याच्यात आज विलक्षण क्राति घडवून आणली होती. नेहमीं प्रमाणे 'ट्रिबल ईव्हेट'नें त्याना चागलाच दगा दिला होता. पण रावसाहेब गोळ्यार्ना—त्याच्या वैऱ्याला—आज तिच्यात पन्नास हजार रुपयाची प्राप्ति झाली होती. इव्हिनिग-न्यूजमध्यें त्याचें नाव ठळक अक्षरात छापलेले दिसत होते.

शर्यतीच्या मैदानावर सर्व लोक म्हणाले होते—

" लकी डॉग दॅट रावसाहेब ! "

अन् नकळत डिसोझासाहेबाच्या तोंडूनहि शब्द निघाले होते—

" लकी डॉग इडीड ! ! "

मग—मग हें वैर कशासाठीं ? उगीच—उगीच ?...... डिसोझा साहेबाचे डोळे आता पुरते उघडले. असल्या 'गुणी' शेजाऱ्याशीं वैरभाव धरण्यात आपण घोडचूक केली अशी त्याना पूर्ण खात्री पटली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्या बरोबर प्रथम रावसाहेब गोळ्याच्या घरीं जाऊन डिसोझा साहेबानीं शर्यतींतल्या विजयाबद्दल त्याचें मनःपूर्वक अभिनदन केले. व त्याच वेळीं आपल्या इतके दिवसाच्या मूर्खपणाच्या वागणूकीबद्दल दिलगिरी व्यक्त केली.

त्या दिवसापासून रावसाहेब गोळ्याच्या मित्रमडळींत डिसोझा साहेबाचा प्रामुख्यानें समावेश होऊं लागला. नि हें पाहून परेरावकीलासुद्धा सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटून राहिलें आहे.

# गूढ ११

पोस्टमननें समोर फेकलेले आपल्या नावाचें पत्र रखमेनें धडधडत्या काळजाने उचलले व नतर पडवीचे दार बाहेरून घट्ट ओढून घेऊन ती तशीच लगबगीनें दाजींच्या घरीं आली. दाजी ओसरीवरच्च होते. नातवडाचा सकाळचा अभ्यास घेऊन आघोळीसाठीं उठण्याच्या तयारींत होते ते. रखमेला पाहून जरा थबकले नि प्रश्नार्थक मुद्रा करून वर पहात म्हणाले,

" काय रखमे, काय काम निघालय् आज ? "

रखमा थोडी सकोचली नि मग हातातले पत्र दाजींच्या जवळ देत म्हणाली,

" नुकतच आलय्,—बघा बर, कुणाचं आहे तें. "

दाजींनीं डबींतली 'चाळिशी' काढून डोळ्यावर चढविली. मग एक मिनिटभर पत्रातल्या फेगड्या अक्षर पक्तीवरून दृष्टि फिरविल्यावर तोंडानें ' हुँः ' असा तिरस्कारयुक्त उद्गार काढून ते म्हणाले,

" आपल्या चिरजीवाचंच दिसतय् "

" कुणाच,—रघूचं ? " रखमेनें उत्सुकतेने विचारले.

" हं. "

" काय म्हणतोय ? बरा आहे ना ? "

" हॅः काय होतंय् त्याला बर नसायला ! " दाजींच्या चेहऱ्यावर पुरेपुर तिरस्कार दिसत होता.

रखमेचे ओठ किंचित् फुरफुरले; पण दाजींचा करडा स्वभाव ठावूक असल्यामुळें तिनें आणखी काहींच विचारले नाहीं. स्तिमित होऊन उभीच राहिली होती ती नुसती.

पत्राचें आणखी एकवार पारायण करून दाजीनीं 'चाळिशी'ला हात घातला व एक लाबलचक जाभई देत ते उद्गारले,—

" काय कराव अन् काय बोलाव ? ही असलीं दिवटीं कारटीं .. म्हणे म्हातारपणीची काठी ! "

दाजींच्या या असबद्ध उद्गाराचा रखमेला उमज पडेना. तिच्या मनात भलभलत्या शकाचा डोंब उसळला. गोंधळलेल्या वृत्तीने तिने चाचरत विचारले,

" अस आहे तरी काय पत्रात ? काय म्हणतोय रघू ? "

" 'वाटेल ते करून दहा रुपये धाडून दे' म्हणतोय. पठाणाच्या हातात सापडलीय मानगूट त्याची ! "

दाजींच्या या खुलाशाने रखमेचा अधिकच गोंधळ उडाला. रडकुंडीस येऊन तिनें विचारले,

" अंऽऽ ? नोकरी गेलीबिली की काय ? "

" अजून नाहीं गेली. पण जाईलसुद्धा एकाद दिवशीं. "

एक आवढा गिळून रखमेने पुढे म्हटले,

" मग पगार तरी काय होतो त्याचा ?—"

" तुला कस कळणार ते ! मोटार ड्रायव्हर आहेना तो ? मग दारू, जुगार सट्टे ही साभाळायला पगार कसा पुरणार त्याला ? त्यासाठीं पठाण-माउलीला गाठून कर्ज काढायच अन् मग—"

रखमा अगदीं दिङ्मूढ झाली. दाजींचीं असलीं बोंचक बोलणीं तिने अनेकवार ऐकलीं होती. पण त्याच्यामागे असलेल्या दाजींच्या सद्धेतूची रखमेला पूर्ण कल्पना असल्यामुळे तिची त्याच्यावरील भक्ति अणुमात्र कमी झाली नव्हती. अडीअडचणीच्या वेळीं ती सल्ल्यासाठीं दाजींच्याकडेच धाव घेई व तेहि तिला आपुलकीनें योग्य तो मार्ग दाखवीत असत.

रखमेनें पदराने डोळे पुसले नि विमनस्कपणें ती बाजूला पाहूं लागली. दोन चार क्षण गेल्यावर दाजीनींच म्हटलें,

" ह ! काय ? मग पाठवा आपल्या चिरजीवाना कुठून तरी काढून पैसे. माया वेडी आहे ना ? "

दार्जीच्या बोलण्यातला उपरोध रखमेला समजल्यावाचून राहिला नाहीं. रघूकडून तिला कधीं एक कवडीही मिळत नव्हती, उलट त्यानेच तिच्याकडून या ना त्या निमित्ताने अनेकदा पैसे नेले होते. चारच महिन्यापूर्वी मोटारसबंधींच्या एका गुन्ह्याचा दड भरण्या-साठीं म्हणून आईकडून त्याने पधरा रुपये नेले होते, इतके काबाडकष्ट करून जवळ केलेली माया रखमेने केवळ मायेमुळे असल्या दिवट्या मुलासाठीं वेचावी हे दार्जीना बिलकुल पसत नव्हते, व त्यानी रखमेला तसे सागितलेंही होते.

पण आजचा दार्जींचा विरोध अधिक तीव्र होता. इतके दिवस झाले ते झाले ! पण यापुढें तरी रखमेनें पुनः तसला मूर्खपणा करू नये अशी त्याची इच्छा होती. रखमेची असहाय्य स्थिति पाहून त्याना तिची भारी कींव आली. तिला आता आणखी डिवचण्यात अर्थ नाही असें वाटून ते तिला सौम्य स्वरानें म्हणाले,

" हे पहा, रखमाई–तुला आज मी स्पष्टच सागतों. काय करायूचींत असली नादान मुल ? झालींच नाहीं अस समजाव. एवढा मोठा मुलगा असताना ह्या वयात तू का काबाडकष्ट करायचे ? ... नीट सरळपणान आपली नोकरी करायची, आईला म्हातारपणीं सुखानं राहू द्यायच, तें राह्यल बाजूलाच ! पण सत्रा भानगडी करून आईच्यामागे घोर उत्पन्न करावयाचे हीं का धड लक्षण ! तें काहीं नाहीं, आता थोडी कठोर हो. काहीं उलाढाली करूं नको, अन् दिडकी सुद्धा पाठवू नको रघ्याला. नावगोष्ट टाक त्याची. "

एवढें बोलून दाजी उठले. पत्र घेऊन रखमाही घरीं जाव-याला निघाली. इतक्यात एकदम काहींतरी आठल्यासारखे करून दाजी तिला म्हणाले,

" आणखीन् हें लक्षात ठेव. तुझ्याकडून पैसे गेले नाहींत म्हणजे दोन तीन दिवसांनी तो स्वतः येईल इकडे. राह्यचा नाहीं आल्याशिवाय पण पै देखील देऊ नकोस ! सरळ 'चालता हो' म्हणून साग त्याला ! नाहीं नाहीं ते सांगेल, त्रागा करील, पण दाद देऊ नको अगदीं ! "

रखमा चूपच होती. यापुढें दाजींच्या शब्दाबाहेर जाणें म्हणजे त्याची सहानुभूति कायमची गमावणें हे तिला चागलें ठाऊक होतें, अन् म्हणूनच आता मुलाच्या बाबतींत आपण थोडें कठोर बनायचें असा निश्चय करून ती घराकडे परतली.

* * *

दाजीनीं भाकीत केल्याप्रमाणे रघू खरोखरच तिसऱ्या दिवशीं रात्रीं घरीं आला.

नऊ साडेनऊची वेळ होती ती. रखमा दिवा मालवून अंथरुणावर पडण्याच्या बेतात होती. दार खडखडले म्हणून ती दारापाशीं गेली. बाहेरून आई अशी क्षीण हाक ऐकूं आली. रखमेचें हृदय धडधडूं लागले. दाजींच्या शब्दाची तिला याच वेळीं आठवण झाली.

दार उघडतात रघू आत आला. किती भकास दिसत होता त्याचा चेहरा ! काळजीनें काळवडलेली त्याची चर्या—ते खोल गेलेले डोळे, तीं वर आलेली गालफडाचीं हाडे,—पाहून रखमेला भडभडून आलें. हृदयाचा कुठला तरी एक कोपरा क्षणभर हादरला. अगदीं वेड्यासारखी पहात होती ती त्याच्या चेहऱ्याकडे. तशाच स्थितींत तिनें त्याला विचारले,

" रघू—रघू काय झाल तुला ? "

रघू कृत्रिमतेनें किंचित हंसला. किती भेसूर दिसत होतें तें हंसणें ! होरपळून निघालेल्या गुलाब कळीवर पाणी शिपडल्यासारखे वाटलें ते रखमेला.

पण थोड्या वेळानें ती भानावर आली, व आपल्या निश्चयाला जागून आता वागायचें असे ठरवून तिनें स्वतःस सावरले.

रघूनें त्या दिवशीं काहीं खाल्ले नव्हते, म्हणून तिनें त्याच्यासाठीं झटकन् दोन तीन भाकऱ्या तयार केल्या व लसणीची थोडी चटणी वाटली.

पोटात अन्न गेल्यावर रघूला जरा बरें वाटले. मग रखमेनें हळू हळू त्याच्या वागणुकीबद्दल सौम्य शब्दात त्याची बरीच कान-उघडणी केली. दीन-पणानें खालीं मान घालून रघू आईचे शब्द ऐकत होता.

शेवटीं जेव्हा रखमेनें त्याला एक पैसुद्धा आपल्याजवळ देण्यासाठीं नाही असे स्पष्ट सागितले, तेव्हा तो अतिशय निराश झाला. त्याच वेळीं रखमेच्या डोळयाच्या कडा किंचित् ओलावल्या.

पहाटेस उठून रघू परत जाणार होता. त्याला अंथरण्यासाठीं रजई देऊन रखमा अथरुणावर पडली.

रात्र बरीच झाली होती, पण रखमेला झोंप येईना. बाहेर जिकडे तिकडे विलक्षण शात होते. दूरवर क्वचित् कुत्र्याचें भुकणें मध्येंच ऐकू येई, व मग पुनः सगळीकडे शात होई. रखमेच्या मनात मात्र निरनिराळ्या विचाराची गर्दी उसळत होती. पलीकडे रघू निजला होता. त्याच्यावर बेतलेल्या प्रसंगाची कल्पना असूनहि ती त्याला विन्मुख पाठवीत होती. अन् ही एकच गोष्ट तिला बेचैन करीत होती. तिच्या मनात येत होते,—

उद्या रघू परत जाईल. पठाण त्याची वाट पहात बसला असेल. वायद्याप्रमाण पैसे मिळाले नाहींत म्हणजे तो रघूला शिवीगाळ करील,—मारहाण सुद्धा करील अन् मग त्याचा परिणाम—कदाचित्—कदाचित् भलताच झाला तर?...... परिस्थितीच्या गाजणुकीन वैतागून त्यान आपल्या जीवाच काहीं बर वाईट केल तर?......छेः!

आपलीं मुलं जगत नव्हती...आपण किती नवससायास केले. शेवटीं रघू झाला. तो वर्षाचा होईपर्यंत आपल्याला त्याची सारखी काळजी वाटत होती...किती गोंडस दिसत होता तो लहानपणी! ...त्याच्या बोलक्या डोळ्याकडे आपण भूक तहान विसरून, तासान् तास पहात बसत असू. त्याला भरवण, न्हाऊमाखूं घालणं,—यातल्या आनदापुढ स्वर्गप्राप्तीचा आनद देखील आपल्याला तुच्छ वाटत असे. त्याला नुसती पडस-सर्दी झाली तरी आपल्या जीवाची कोण धादल उठे!...

पण आज आपण त्याला जाणून बुजून दूर करीत आहों अन् त्याची आपली पुनः भेटसुद्धा—

कुठल्या तरी कोंपऱ्यात पाल चुकचुकली. मनात कुशका येऊन रखमेच्या काळजाचा थरकाप उडाला. तुफानीं वादळात सापडलेले जहाज अकस्मात् अजस्र खडकावर आदळावें अन् त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाव्यात तशी रखमेची स्थिति झाली. तिचें मस्तक बधिर झाले. डोळ्याच्या पापण्या जड झाल्या, व एकाएकीं तिला विलक्षण ग्लानी वाटूं लागली.

* * *

रखमा एकदम दचकून जागी झाली. किती विचित्र अन् भयकर स्वप्न पडलें होते तिला?—रघू व आपण एका उच डोंगराच्या कड्यावर चढून गेलों आहोत ..एका बाजूला भयाण दरी असून भोंवताली अधिकाधिक अंधार दाटत आहे. इतक्यात कड्यावरून पाय घसरून रघू त्या दरींत पडतो. त्याची करूण किंकाळी ऐकताच आपण असहाय्यपणे हंबरडा फोडला आहे...

रखमेनें डोळे विस्फारून भोंवताली पाहिले. रघू उठून जायची तयारी करीत होता. त्याला पाहून रखमेला धीर आला. ती तशीच उठली. फडताळ उघडून तिनें आतून एक पुरचुंडी काढली व ती रघूच्या हातीं देत ती त्याला म्हणाली,

"हं,—घे बर बाळ हे दहा रुपये!"

# पहिला पराक्रम १२

एकादा सुदरसा लेख किवा तसेंच एकादे ' अमर ' काव्य लिहून साहित्य क्षेत्रात पराक्रम गाजवावा अशी एक जबरदस्त इच्छा, ' बुल ॲण्ड बुलडॉग ' कपनीच्या ' ऑडिट डिपार्टमेंट ' मधला एक ज्युनिअर क्लार्क बाळाभाऊ बिवलकर याच्या मनात आज कित्येक दिवसापासून दबा धरून बसली होती.

आज सकाळींच ' ज्ञाती ' च्या त्रैमासिकात त्याचा प्रतिस्पर्धी कवि काळभैरव याची एक कविता छापून आल्याचे त्यानें आपल्या डोळ्यानी पाहिले होते. अन् तेव्हापासून त्याचें कशाकडेच लक्ष लागत नव्हते. कसेहि करून एकादी कविता लिहून ती शक्य तितक्या लवकर एकाद्या ' पुरोगामी ' मासिकात छापून आणायची नि सगळ्या जगाला—अर्थात ' बुल ॲण्ड बुलडॉग ' कपनीच्या साऱ्या कारकून मडळीला—चकित करून सोडायचें या एकाच विचारात आज बाळाभाऊचें चित्त व्यग्र झालें होतें.

टेबलावर ऑफीसच्या कामाचा ढीग पडला होता. पण आकडे-मोडीचें काव्यहीन काम बाजूस ठेवून बाळाभाऊ आज ' अमर '—काव्य निर्मितीसाठीं शारदादेवीला सारखा आळवीत होता.

शार्दूलविक्रीडित, मंदाक्राता, पृथ्वी इत्यादि वृत्ताचीं लक्षणें त्याला अगदीं तोंडपाठ येत होतीं. पण त्याच्या उत्स्फूर्त कल्पना त्यापैकीं एकातहि गुण्यागोविंदानें बसूं शकत नव्हत्या. मोठी

आटापीट करून पहिली ओळ मंदाक्राता वृत्तात लिहावी अन् दुसरी ओळ पृथ्वीशिवाय दुसऱ्या कोणत्याच वृत्तात बसण्याचें अशक्य व्हावें ! तब्बल तीन तास होऊन गेले तरी असलाच प्रकार चालू ! शेवटीं अगदीं सोपा म्हणून मुक्तछद घेतला, पण छेः ! या जन्मीं आपल्या हातून काव्य निर्मिती होईल असे बाळाभाऊला वाटेना.

" काय मिस्टर बिवलकर—काय आहे भानगड ? " बाळाभाऊच्या पाठीवर थाप देत, मिष्किलपणानें डोळे मिचकावून दत्तोबा दाण्यानें विचारलें.

बाळाभाऊ थोडा खजील झाला, कारण दत्तोबासमोर आता काहीं लपवून ठेवणे शक्य नव्हते.

दत्तोबाने त्याच्या समोरचा कागद उचलून घेतला अन् त्यावरून दृष्टि फिरविताच त्याला इतके अनावर हसू कोसळले कीं, बाळाभाऊला अगदीं मेल्याहून मेल्यासारखे झाले. पण थोड्यावेळाने अगदीं गभीर मुद्रा करून दत्तोबा त्याला म्हणाला,

" हत् रे वेड्या ! येवढ्यासाठींच का तीन तास सारख डोक खाजवीत बसला होतास ? "

बाळाभाऊनें त्याच्याकडे आशेने पाहिले.

दत्तोबा पुढें म्हणाला,

" अरे मग मला का नाहीं सागितलंस मी देतों तुला हव्या तितक्या कविता करून. अरे बाबा, Friend in need is a friend indeed! "

दत्तोबा दाण्याला कविता करण्याचा नाद होता; व त्यानें 'ट' ला 'ट' जुळवून तयार केलेल्या काहीं कविता बाळाभाऊला माहितहि होत्या. पण इतके दिवस त्याला आपल्या काव्यलेखनाविषयीं भलताच आत्मविश्वास वाटत असल्यामुळें त्याकामीं दत्तोबाची

मदत घेण्याची कल्पना त्याच्या मनाला कधींच शिवली नव्हती. आज त्याच्या भ्रमाचा भोपळा फुटला होता.

शेवटीं दोन तीन क्षण परिस्थितीचा गभीरपणाने विचार करून त्याने दत्तोबाला हलक्या आवाजात म्हटले,

" बरं दे तर एक कविता करून. पण अगदीं झकास हं ! "

" आ ऽ ऽ ऽ च्छा ! चल काढ—चिवडा, शकरपाळी, अन् एक सिगल ! "

" बस्स ? "

* * *

दुसऱ्या दिवशीं दत्तोबाने खरोखरीच एक कविता लिहून आणून ती बाळाभाऊच्या स्वाधीन केली. बाळाभाऊचा आनद गगनात मावेना. ऑफिसात काम करताना मधून मधून चोरून तो त्या कवितेचा आस्वाद घेत होता. त्याला ती कविता इतकी आवडली होती कीं ती निर्माण करण्यात दत्तोबाने आपली सगळी कला खर्च केली असावी यात त्याला बिलकुल शका वाटत नव्हती. दत्तोबाचे अक्षर मोत्यासारखे सुदर असल्यामुळे कवितेचें सौंदर्य तर प्रत्यक्ष डोळ्यानाच दिसत होते, पण तिच्यात प्रसादहि भरपूर असावा असा बाळाभाऊला बळकट विश्वास वाटत होता. असली सुदर कविता लिहून देऊन दत्तोबाने केलेल्या उपकाराच्या ओझ्याखालीं चेगरून गेल्यासारखे बाळाभाऊला सारखे वाटत होते.

मग त्याच दिवशीं सध्याकाळच्या टपालानें बाळाभाऊनें आपल्या हस्ताक्षरात केलेली तिची नक्कल 'उद्यान' मासिकाकडे रवाना केली.

यानतर चार दिवस झाले, आठ दिवस झाले, पधरा दिवसहि होऊन गेले; पण 'उद्यान' मासिकाच्या सपादकाकडून अपेक्षेप्रमाणें कविता स्वीकारल्याचें पत्र बाळाभाऊला आलें नाहीं.

बाळाभाऊला अगदीं चैन पडेना. सपादकाच्या या दीर्घसूत्रीपणाची त्याला चीड आली. रागाच्या भरात त्यानें संपादकाला एक 'झणझणीत' पत्र लिहिलें व उत्तरासाठीं त्यासोबत मुद्दाम एक आण्याचें तिकिटहि पाठवून दिले.

अन् मग एक दिवस अचानकपणें पोस्टमननें बाळाभाऊला एक पाकीट आणून दिले. त्यावेळीं तो ऑफिसात जायच्या धादलीत होता. बाळाभाऊनें ते लगबगीने उघडले. सपादकाकडूनच आलेलें होतें तें. मोठ्या हर्षानेंच बाळाभाऊनें ते वाचायला सुरुवात केली. पण हाय! त्या पत्रानें बाळाभाऊच्या मस्तकावर वज्राघातच केला.

पत्रात लिहिलेले होते—

"......सोबत 'आपली' कविता परत पाठवीत आहें. सदरहू कविता सुप्रसिद्ध प्रथितयश कवि श्री. रत्नाकर याची असून ती तीन वर्षापूर्वींच आमच्या मासिकात प्रसिद्ध झालेली आहे. दुसऱ्याची कविता जशीच्या तशी आपल्या नावावर पुनः प्रसिद्धीसाठीं त्याच नियतकालिकाकडे पाठविण्याची कल्पना जितकी धाडसाची तितकीच अभिनव आहे . . " वगैरे वगैरे.

पत्र वाचून बाळाभाऊला घेरीच आली.

## सुटी कारणीं कशी लागेल ?

**वादविवेचन मालेचीं**

सुलभ समाजवाद, फॅसिझम्, साम्राज्यशाही, अराज्यवाद, लोकशाही, मार्क्संचा भौतिकवाद, ईश्वरवाद, गांधीवाद, जडवाद, राष्ट्रवाद, कम्युनिझम्, हिंदुत्व वाद व मार्क्संचें कॅपिटल् हीं पुस्तके वाचून

सुटीनतर शाळा, हायस्कुले, कॉलेजे, याना लागणारीं सर्व पुस्तकें घेण्यासाठीं

## ‘ धी बॉम्बे बुक डेपो ’

गिरगांव, मुंबई ४

( फो. न. ३३८९२ ) येथेच या.

**वि. सू.**:—व्यापारी, लायब्ररी्या व शिक्षक याना भरपूर कमिशन.

---

**लहान मुलांची आंकडी ! गडबडून जाण्याचें कारण नाहीं !**

**वसईचे**

# डॉ. वामन गजानन जावळे

L. C. P. S. M. P.

यांच्या

आंकडीवरील रामबाण औषधाने त्वरित गुण येऊन मूल हंसूं बागडूं लागेल.

गरीबांस या औषधाचा विनामुल्य फायदा.

**दवाखान्याचा पत्ता : पारनाका वसई**

## हा कशाचा बरं प्रताप !

कॉलेजला नुकतीच सुटी पडून सुरेश आपला मित्र शशिकांत ह्याच्या फार आग्रहाच्या आमंत्रणामुळे त्याच्या गावीं पाहुणा म्हणून आला होता. दुपारच्या निवांत अशा वेळीं हिंदोळ्यावर झोके घेत शशिकांताची बहीण रजनी टेबलक्लॉथ भरण्यात अगदींच गढून गेली होती. तिची ती डिझाइन भरण्याची मोहक पद्धत, व तिनं भरलेले ते सारे नमुने पाहून तो इतका खुश झाला कीं, त्यानं शशिकांताजवळ तिच्याबद्दल मागणी घातली. तेव्हा रजनीची आई म्हणाली " आमची रजनी किनई आहेच मुळीं अशी " ! पण त्यावर नानासाहेब म्हणाले " **हा सारा पोतदार कंपनीच्याच** डिझाइनचा प्रताप बर "

**पोतदार आणि कंपनी, भरतकामाचे व्यापारी,**

१८ भाईजीवनजी लेन, ठाकुरद्वार मुंबई २

**तुम्हांला घर बांधावयाचें आहे ना ?**

मग हे लक्षात घ्या !

**वसईंत खात्रीचीं मंगलोरी कौलें मिळण्याचें एकच ठिकाण.**

**धर्मा हिरा पाटील यांचा**

## मंगलोरी कौलांचा डेपो

उगीच अविचाराने कुठे तरी हलकीं कौलें खरेदी करून पस्तावूं नका ! आमचेकडे सर्व तऱ्हेची मंगलोरी कौले किफायतशीर भावाने मिळतात.

पत्ता—**वसई, झेंडाबाजार**

तुम्हांला उत्तम फोटो पाहिजेत ना?

मग

## जी. एच्. पाटील यांचेच

# फोटो स्टुडिओंत

## आपले फोटो काढून घ्या

पत्ता : **झेंडाबाजार बसई**

**माणसाचा दर्जा** वाढविण्यास त्याचे कपडेहि कारणीभूत होतात. म्हणूनच आपणांस मनपसंत कपडे अगदीं माफक दरांत शिवून घ्यायचे असल्यास—

# मेसर्स देवधर ॲण्ड ब्रदर्स

**टेलर्स ॲण्ड आऊट फिटर्स यांनाच भेट द्या.**

पत्ता:—**होळी बाजार, बसई.**

वाचा आणि लक्षांत ठेवा

सर्व तऱ्हेचा स्वस्त आणि खात्रीलायक माल मिळण्याचें एकच ठिकाण म्हणजे—

## धी जनरल स्टोअर्स, बॅसीन

आमचेकडे स्टेशनरी, पर्फ्यूमरी, कटलरी, लज्जतदार चहा तसेच सर्व तऱ्हेचीं देशी औषधे मिळतील. ऑर्डरप्रमाणें माल पुरविला जाईल.

त्वरा करा. एकच वेळ प्रत्यक्ष भेट देऊन खात्री करून घ्या. अनुभव हीच खात्री. सत्य आणि सचोटी हेच आमचें ब्रीद.

प्रोप्रायटरः—**दळवी बी. जे.** पत्ताः—**धी जनरल स्टोअर्स,**
बॅसीन ( बाजार पेठ ).

---

तज्ञ कलावंत कुशल कारागिरी

यांचा मिलाफ

म्हणजेच

**य. ना. हटकर यांचा**

## ओतकामाचा कारखाना

**झेंडा बझार, वसई; ठाणा**

येथें ल्हानशा मूर्तीपासून मोठमोठया पुतळ्यांपर्यंतचें ओतकाम समाधानकारकपणें केलें जातें. तसेंच अद्यावत 'बिल्डिंग् फिटिंग्ज' येथें बसविलीं जातात.